नवभारत Regd. No. M H 1332

# नवभारत

## या अंकात –



वर्ष २७

अंक आठवा

मे १९७४

रु. १-२५












नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशालामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे
अंक आठवा

# नवभारत

मे
१९७४

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

*संपादक-मंडळ*

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



**वार्षिक रु. १२** **अंकास रु. १·२५**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशालामंडळ वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका






डॉ. र. चिं. वडवे

# समाजवादी धर्तीची समाजरचना : ३ :

## ( उद्दिष्ट व फलित )

समाजवादी धर्तीची समाजरचना स्थापण्याचे उद्दिष्ट समोर ठेवून गेल्या १५-२० वर्षांत नियोजनद्वारा शासनाने कसकशी पावले टाकली व त्यातून कोणते फलित पदरात पडले याचा आढावा गेल्या दोन लेखात आपण घेतला : तो नजरेसमोर ठेवून या नियोजनासंबंधी काही सामान्य विचार व्यक्तविण्याचा ह्या लेखाचा हेतू आहे.

### १ नियोजनातील पर्वतप्राय अडचणी –

नियोजनाद्वारे अमुक व्हावयास हवे होते, तमुक व्हावयास नको होते असे कंठरवाने प्रतिपादणे व त्याप्रमाणे न झाल्यास शासन व नियोजनकार यांचे निष्ठुरपणे वाभाडे काढणे सोपे असले तरी ते फारसे इष्ट होईलसे वाटत नाही. त्यांच्या अडचणी विचारात घेऊन सहानुभूतीने व आपलेपणाने टीका करणे व विधायक स्वरूपाच्या सुधारणा सुचविणे हाच मार्ग अंती उपयुक्त ठरेल अशी या लेखाची भूमिका आहे. आपल्या देशात नियोजनद्वारा प्रगति साधण्याच्या कामातील कांही अडचणींचा उल्लेख पुढे केला आहे :

अ) देशाचा प्रचंड विस्तार व तितकीच प्रचंड व त्यातही दरसाल मोठी भर पडत आलेली लोकसंख्या. उपलब्ध असणारी वा होऊ शकणारी दळण-वळण उत्पादनाची व इतर साधने लक्षात घेता या सर्व जनतेला व देशाच्या सर्व भागाना स्पर्शील असे नियोजन करणे सहजसाध्य नाही. मात्र ते असाध्य नसून कष्टसाध्य आहे.

आ) देशातील प्रत्येक राज्य हेही जणु एकेक राष्ट्रच असून त्यात धार्मिक, भाषिक, आर्थिक, सामाजिक, इत्यादी बाबतीत प्रचंड विविधता असल्याने व त्यांचे हितसंबंध वेगवेगळेच नव्हे तर प्रसंगी परस्परविरोधीही असल्याने या सर्वांचा समन्वय करण्यात शासन व नियोजनकार यांची कसोटीच लागते.

इ) दारिद्र्य, अशिक्षितता, पारंपरिकता, अंधश्रद्धा वगैरेचे देशात मुक्त साम्राज्य पसरलेले असल्याने या सर्वांचे निर्मूलन करून जनतेची उन्नति अमुक मुदतीत घडवून आणल्यास भगीरथ प्रयत्नही तोटके पडतील. भगीरथासारखी उच्च कार्यक्षमता व ध्येयनिष्ठा नसेल तर बोलायलाच नको.

ई) नियोजनाची पुरेपूर फळे पदरात पडणे असेल तर त्यासाठी एकतंत्री कारवाई अधिक उपयुक्त ठरेल. परंतु आपण लोकशाही मार्गानेच जाण्याची प्रतिज्ञा घेतली असल्याने भरघोस फळे योग्य मुदतीत पदरात नक्की पडतील ही अपेक्षा अवास्तव ठरण्याचाच संभव अधिक. लोकशाहीतील जनतेचे प्रतिनिधी हे कांही अंशाने तरी जनतेच्याच पातळीतील असल्याने कर्तबगार व्यक्ती बाजूला पडून नियोजनावर विपरीत परिणाम होतो.

उ) नियोजनपर्व सुरू होण्यापूर्वी दीड दोन शतके देश पारतंत्र्यात असल्याने शासनकर्त्यांचा शासकीय अनुभव तुटपुंजाच होता. त्यामुळे ध्येय व व्यवहार यांची सांगड घालण्याच्या बाबतीत ते अपुरे पडण्याची शक्यता मोठी होती. नियोजनाचे मूल्यमापन न्याय्य होणे असेल तर या अडचणी लक्षात घ्याव्यास हव्यात.

## २ देश आर्थिकदृष्ट्या समृद्ध होत आहे; परंतु –

गेल्या २० वर्षात देशाने प्रगतीचा नजरेत भरण्याजोगा टप्पा गांठला आहे हे मोकळ्या मनाने मान्य करावयास हवे. राष्ट्रीय उत्पन्न ४७% व दरडोई उत्पन्न २०% वाढले आहे. वाहतुक, शेती शिक्षणप्रसार, उद्योगधंदे, व्यापार, आरोग्याच्या सुखसोयी इ. आघाड्यांवर पंचवार्षिक योजना उपयुक्त ठरल्याचे निश्चितपणे दिसून येते. लोकांच्या राहणीमानातही सुधारणा होत आहे. या प्रगतीमुळेच समर्थांच्या घरच्या श्वानाप्रमाणे आपल्यावर सदैव गुरगुरणाऱ्या व चावा घेण्याची संधि साधण्यात पुरुषार्थ मानणाऱ्या पाकिस्तानला आपण दोन तीन वेळा संपूर्ण धूळ चारू शकलो. अर्थातच दोनी देशाचा विस्तार लक्षात घेता यात मोठी बहादुरी झाली असे नाही हे खरे असले तरी जे आहे त्याचा रास्त अभिमान बाळगण्यात काहीच वावगे नाही. स्वावलंबनाच्या दिशेने आपली मजल थोडी समाधानकारक आहे. हे सर्व मान्य केल्यानंतर लेखांक २ मध्ये उल्लेखिलेली दुसरी बाजूही विचारात घ्यावयास हवी. देशाची समृद्धता वाढत असतानाच दारिद्र्यही वाढत असून त्याकडे डोळेझांक करणे आत्मघाती ठरेल.

देशात श्रीमंतांची संख्या वाढत असतानाच भिकारी, बेकार, निवारा वा इतर मूलभूत सुविधा उपलब्ध होऊ शकणाऱ्यांची संख्याही सर्वत्र वाढत आहे. मेजवान्यांनंतर त्यांत जेवणाऱ्यांच्या पानांतील उष्टया पदार्थांवर तुटून पडणाऱ्यांची संख्या अद्यापीही कमी झालेली नाही हे या दारिद्र्याचेच लक्षण होय. नियोजित अर्थव्यवस्थेच्या सुरवातीच्या काळात त्याचा लाभ समाजांतील खालच्या थरांना मिळू शकला नाही हे निदान समजू शकते; परंतु २० वर्षानंतरही यांत फरक पडू नये याचा अर्थ आपल्या नियोजनांतच काहीतरी मूलभूत दोष आहे असाच होतो. त्याचा शोध घेऊन तो दूर करण्याचे उत्तरदायित्व समाजवादाचे कंकण बांधणाऱ्यांना मुळीच टाळता येणार नाही. याची जाणीव गेली १०।१५ वर्षे तरी नियोजनकारांना असूनही विषमता कमी करण्याचा पोकळ पुकारा पुन: पुन्हा करण्यावाचून इतर काही प्रत्यक्ष करण्यांकडे त्यांनी लक्ष दिल्याचे अनुभवात येत नाही; ही खेदाची गोष्ट होय.

## ३ भाववाढीचा भस्मासूर

वाढत्या समृद्धीचा लाभ समाजांतील फक्त वरच्या थरांच्याच पदरात पडतो व खालचे थर आहे तसेच राहतात किंबहुना अधिक खाली जातात याचे एक महत्वाचे कारण म्हणजे पंचवार्षिक योजनेच्या सुरवातीपासून आजतागायत सतत होणारी भाववाढ हे होय. यामुळे मध्यम व कनिष्ठ वर्ग आर्थिक दृष्टया नागवले जातात व रुपयांच्या स्वरूपात त्यांचे उत्पन्न वाढलेले दिसले तरी क्रयशक्ति घटत जाते हे कोणाच्याही लक्षात येण्याजोगे आहे. भाववाढ रोखणे असेल अथवा मर्यादित ठेवणे असेल तर नियोजन अधिक सर्वंकश व्हावयास हवे; उत्पादन, वितरण व भाव या तिघांचाही समावेश नियंत्रणात व्हावयास हवा. आपल्या नियोजनात फक्त उत्पादन व तेही अर्धवट नियंत्रणाखाली आहे; बाकीचे दोन घटक बहुतांशी बाहेरच आहेत. यामुळेच शासनाला भाव रोखता येत नाहीत. त्याने तसा प्रयत्न केला तर वस्तूच गडप होण्याचा धोका संभवतो. म्हणून यापुढील योजना आखताना शासनाने भाव रोखण्यास प्राधान्य देणे जरूरीचे आहे. कोणत्याही कारणाने हे जमत नसेल तर अन्नधान्यादि जीवनावश्यक वस्तु गरिबांना बऱ्याच कमी भावांत उपलब्ध करून देण्याची प्रथम तजवीज केली पाहिजे. मद्रासचे माजी मुख्यमंत्री कै. आण्णादुराई यांनी रुपया किलो भावाने तांदुळ उपलब्ध करून असंख्यांचा दुवा मिळविला होता हे प्रसिद्धच आहे. मग इतरत्र तसे का करण्यात येऊ नये ? लोकसंख्या वाढीचा वेग लक्षात घेता सर्वंकश नियंत्रण व स्थिर बाजारभाव १०० % साधणे

अशक्यच दिसते. यातून मार्ग न काढू शकण्याइतके आपण बुद्धिदरिद्री आहोत काय? समृद्धीचा लाभ खालवर पोचविण्यासाठी बाजारभाव रोखण्याचे महत्व नियोजनकारांनी कधीच लक्षात घेतले नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय.

४ साध्यांबाबतच्या विचारांतील गोंधळ व कणखरपणाचा अभाव

समृद्धि वाढविणे व विषमता कमी करून सामाजिक न्याय प्रस्थापिणे हे आपल्या नियोजनाचे उद्दिष्ट असून ते योग्य आहे. परंतु त्यादोनी गोष्टी एक-समयावच्छेदेकरून साध्य होणे लोकशाहीमुळे अशक्य ठरल्यास प्राधान्य कोणास द्यावयाचे या संबंधीच्या धोरणात बराच गोंधळ दिसतो. दर पांच वर्षांनी किंवा त्याच्यापूर्वी मतदारांचा कौल घेण्याची जरूरी लक्षात घेता राज्यकर्त्यांनी सामाजिक न्यायावर भर देणे समजू शकते; परंतु २० वर्षांत तसे घडलेले मात्र दिसून येत नाही. विषमतेची दरी भरून निघण्याला सुरुवातही झालेली अनुभवात येत नाही. उत्पादनवाढीचा लाभ या वाढीला स्वयंगतित्व देण्याच्या स्वरूपातही फारसा मिळालेला दिसत नाही. तात्पर्य असे की दोन्ही थडीवर हात ठेवण्याचे आपले प्रयत्न निष्फळ ठरत आहेत. म्हणून धोरणात बदल करणे अपरिहार्य आहे. विषमता कमी करण्याच्या उद्दिष्टाऐवजी प्रत्येक व्यक्तीच्या किमान मूलभूत गरजा भागविणे हे उद्दिष्ट अधिक वास्तववादी ठरेल. आर्थिक समृद्धतेची अमुक पातळी गाठेपर्यंत सामाजिक न्यायासाठी म्हणून होणारा बहुतांशी अनुत्पादित व्यय हाही किमान पातळीवरच ठेवून, नियोजनातून मिळणारा आर्थिक लाभ अधिक उत्पादनासाठीच वापरण्यावर भर द्यावयास हवा. यासाठी सामाजिक न्यायाच्या उद्दिष्टाला थोडीफार मुरड घालायला हवी. रशियाने २०।२५ वर्षे पर्यंत केलेल्या नियोजनात हे धोरण कटाक्षाने पाळले होते. प्रत्येकाला काम मिळाले पाहिजे या बरोबरच उत्पादनकार्यात गुंतलेल्यांना उत्पादनवाढीचा लाभ उपलब्ध करून न देता त्यांच्याकडून काम मात्र अगदी निष्ठुरपणे चापून चोपून घेण्याचे धोरण तेथील हुकूमशाहीने सातत्याने अवलंबिले होते. यामुळे किमान कामगाराच्या परिस्थितीत वर्षानुवर्षे म्हणावी अशी सुधारणा झाली नाही हे खरे. परंतु देशाची सर्वांगीण समृद्धता वाढत गेल्याने देश दुसऱ्या महायुद्धातील बिकट परिस्थितीतूनही तावून सुलाखून बाहेर पडला व जगातील सर्वांत प्रबळ अशा दोन राष्ट्रांपैकी एकाचे स्थान प्राप्त करून घेऊ शकला. या मानाने आपली २०।२२ वर्षांतील प्रगती अगदीच किरकोळ भासते. पाकिस्तानसारख्या तुलनेने अगदी लहान असलेल्या राष्ट्रावरील आपल्या विजयाचे भांडवल करण्यात मतलब नाही. चीनने स्वारी केल्याबरोबर आपले

कंबरडे मोडले हे महत्वाचे आहे. म्हणूनच देशसमृद्धि व सामाजिक न्याय यात विरोध आल्यास समृद्धीला प्राधान्य देण्याची गरज ओळखूनच नियोजन करण्यात आले पाहिजे, असे होत नसल्यानेच प्रगतीला वेग मिळत नाही. सामाजिक न्यायासाठी म्हणून केलेल्या उपायानी गरीबवर्गाची स्थिती सुधारत नाही हे निराळेच.

याचा अर्थ असा मात्र नव्हे की आपणही हुकूमशाही राष्ट्रांप्रमाणे अमानुषतेचा अवलंब केला पाहिजे. लोकशाही मार्गानेही हे साधणे निदान काही अंशी तरी अगदी शक्य आहे. मात्र त्यासाठी आपल्या राजकीय व विशेषतः राज्यकर्त्या पक्षानी सारासार विवेक दाखविला पाहिजे. समृद्धीची खुमासदार चित्रे वेळी अवेळी रंगवून जनतेच्या इच्छा-आकांक्षाना खतपाणी घालण्याऐवजी सर्वंकष अशा त्यागातूनच देश बलिष्ठ होऊ शकेल हे तिच्या मनावर सतत बिंबविले पाहिजे: व तेही 'जनहो खादी वापरा' असा परोपदेशे पांडित्याच्या थाटात नव्हे तर स्वतःच्या त्यागमय आचरणाचा आदर्श समोर ठेवून. सध्या याच्या उलट मामला चाललेला दिसतो. गांधीजींचे नांव घेत घेत अधिकारारूढ व्यक्ति व पक्ष व इतर उच्चपदस्थ मंडळी यांचे आचरण व रहाणी कुबेरालाही लाजवील अशा थाटामाटाची होत असून त्यात वशिलेबाजी, खाबूपणा, उधळपट्टी, नागडा उघडा स्वार्थ इ. दुर्गुणांचे पेव सर्वत्र फुटलेले दिसत आहे. 'यद्यदाचरति श्रेष्ठः' या न्यायाने सर्वत्र वरपासून खालपर्यंत याच दुर्गुणांचा धुमाकूळ चालू आहे. आपले कष्ट व त्याग यातूनच देश बलिष्ठ होणार आहे ही जाणीवच बुजून जाऊन शासन सर्व काही करणार आहे व या वाहत्या गंगेतून आपण आपापले हात धुवून घेण्यातच पुरुषार्थ आहे अशा थाटात जनता वागत आहे. शासन म्हणजे आपणच व ते जे करू इच्छिते ते आपणच करायचे आहे हे लक्षात घेण्याच्या मनःस्थितीत फारसे कोणी नाही. अशा स्थितीत नियोजनामुळे अपेक्षित प्रगति होणार कशी, देश आर्थिक गुंतवणुकीच्या प्रमाणात बलिष्ठ होणार कसा व नियोजनाचा खराखुरा लाभ गरिबाच्या पदरात पडणार कसा व केव्हा ? म्हणून राज्यकर्त्या पक्षाने तरी अवास्तव व भ्रांत कल्पना प्रसृत करण्यात शक्ति व काल यांचा अपव्यय करण्याऐवजी आपल्या डोक्यातील विचार सुस्पष्ट बनवून त्यानुसार जनतेस मार्गदर्शन करण्याची आज निकड आहे. लोकप्रियतेच्या अश्वावर कायमचे आरूढ होण्याचा दृष्टिकोन स्वीकारून हे साधणार नाही. आपले निश्चित साध्य काय आहे, ते साधण्याचे टप्पे कोणते, परिस्थितीजन्य विरोधातून मार्ग काढण्याचे सिद्धांत कोणते हे सर्व वेळापत्रकासह काटेकोरपणे ठरवून व त्यासंबंधी जनतेला





विश्वासात घेऊन पावले टाकली तर जनता जरूर तो प्रतिसाद दिल्याशिवाय राहणार नाही. आज या सर्वच बाबतीत हडेलहप्पीपणा व गोंधळाची स्थिती आहे. जनता व राज्यकर्ते आत्मसमृद्धीच्या वा पक्षसमृद्धीच्या नादात मशगुल झाले आहेत. खऱ्याखुऱ्या अर्थाने नियोजन चालू असलेले दिसत नाही. दीर्घ-कालीन धोरणाचा प्रत्यय त्यातून येत नाही. भ्रांत तत्त्वज्ञानाच्या जोखडातून अद्याप मुक्तता झालेली नाही. यामुळेच उद्योगधंदे वाढत असले, देशाची समृद्धि वाढत असली तरी हे सर्व सुकाणू नसलेल्या जहाजाच्या भरकटण्याप्रमाणे होत आहे. ही परिस्थिती संपविण्याची आज निकड आहे.

५ समाजवादाचा अर्थ निश्चित करण्याची आवश्यकता–

समाजवाद अथवा समाजवादी धर्तीची समाजरचना या ध्येयाचा पुकारा करतानाच नियोजनकारांनी अशीही कबुली दिली आहे की या शब्दांचा निश्चित असा अर्थ सांगता येणार नाही. कारण इतकेच की तो अर्थ परिस्थितिसापेक्ष व म्हणून अनिश्चित आहे. निरनिराळी माणसे वेगवेगळा अर्थ सांगू शकतील म्हणू-नच माझे स्पष्ट मागणे आहे की अर्थाच्या या अनिश्चिततेमागे लपून दरवेळी काहीतरी अर्थहीन वक्तव्ये करण्याऐवजी चालू परिस्थितीचे कांटेकोर पृथक्करण करून त्यांत समाजवादाच्या नावाने तुम्ही निश्चित कोणती सुधारणा करू इच्छिता हे कृपाळू होऊन आम्हा गरिबाना एकदा समजावून सांगा. 'गरिबी हटाव', 'समाजवादाकडे वाटचाल, 'विषमतेची दरी बुडविण्याचा प्रयत्न' सर्वांना सारख्या सुविधा व समानसंधी इ. शब्दरंजनातून प्रत्यक्ष कृतीचा काहीच बोध होत नाही व आपण खरोखरी कोठे चाललो आहोत हेही लक्षात येत नाही. परंतु असे सुस्पष्ट विवेचन करण्याच्या फंदात कोणी फारसे पडताना दिसत नाही व सर्वसाधारण जनतेलाही त्याची जरूर भासत नाही. अशा स्थितीत चर्चेचा उपन्यास म्हणून मला काय वाटते ते येथे स्पष्ट करीत आहे.

१) पहिली गोष्ट अशी की समाजवाद म्हणजे सगळ्यांना सगळे सारखे हा अनेकांच्या डोक्यात घर करून बसलेला अर्थ कितीही भव्य, उदात्त व आकर्षक वाटला तरी तो संपूर्ण अवास्तव व अव्यवहार्य आहे. कार्ल मार्क्सलासुद्धा हा अर्थ अभिप्रेत नाही हे आपण पाहिलेच आहे. कोणापासून कोणत्या कामाची अपेक्षा करावी व कोणाला काय दाम मिळावे हे बहुतांशी त्या त्या व्यक्तीचे गुणावगुण, कर्तबगारी व लायकीवर अवलंबून असावयास हवे. व्यक्तिगत भिन्नता (शारिरीक व मानसिक) निसर्गनिर्मित असल्याने तिच्यात संपूर्ण वा मलग्राही परिवर्तन घडवून आणणे सध्या तरी आपल्या हाती नाही.

अनुक्रमणिका

थोडीफार बोथट करणेच फक्त शक्य आहे. शारीरिक भिन्नतेपेक्षा मानसिक भिन्नता अधिक मूलग्राही आहे. यामुळेच समतेवर आधारलेला कोणताही समाजविषयक सिद्धांत वास्तववादी ठरणार नाही. संपूर्ण समतेची कल्पना हा भ्रांत ध्येयवाद होय. जर त्याची कार्यवाही करण्याचा कोणी प्रयत्न खरोखरीच केला तर त्याची अल्पावधीतच तीव्र प्रतिक्रिया होऊन तो प्रयत्न कोलमडून पडेल. सर्वंकष समतेला निसर्गाच्या योजनेत कोठेही स्थान नाही व निसर्गनिर्मित मानवाला निसर्गाच्या मूलभूत योजनांच्या विरुद्ध जाऊन अशी समता प्रस्थापिण्यात यश येणार नाही. वैज्ञानिक प्रगतीने निसर्गनिर्मित विषमता नष्ट करण्याची गुरुकिल्ली गवसली तर मात्र गोष्ट निराळी.

२) यावर कोणीही स्वाभाविकपणेच विचारील की मग आहे हीच समाजरचना चालु रहावी असे तुमचे म्हणणे आहे काय ? यालाही माझे उत्तर ठामपणे नकारार्थी आहे. याची कारणे तीन:एक म्हणजे काही विषमता निसर्गनिर्मित नसून मानवनिर्मित असल्याने ती शक्यतो दूर करणे नुसते शक्यच नव्हे तर इष्टही होईल. कारण त्यामुळे मत्सर ह्या विकाराचे क्षेत्र थोडे संकोचेल, व तद्भूत संघर्षही कमी होतील. दुसरे असे की विषमता ही जशी काही अंशी मूलभूत आहे तशीच निसर्गयोजनेत काही अंशी समताही मूलभूत आहे. उदाहरणार्थ बुद्धिमत्तेच्या बाबतीत जशी व्यक्तिगत भिन्नता असते तशीच प्रत्येक व्यक्तीत थोडीफार बुद्धि ही असतेच. संपूर्ण बुद्धिविहीन माणूस आढळत नाही याचा अर्थ असा की सर्वांना सगळे सारखे हा ध्येयवाद जसा भ्रान्त तसेच असुक विभागांना काही मूलभूत गरजा भागविण्यापासून वंचित राहू देणे वा ठेवण्याचा प्रयत्न करणे हेही परिणामी भ्रान्तच. ते निसर्गक्रमाच्या विरुद्ध असल्याने अंती घातुक ठरेल. तिसरे कारण म्हणजे पृथ्वी ही सर्वांची माता असून आपण सर्वजण ( प्राणीसुद्धा ) तिची लेकरे आहोत. ही लेकरे एकसारखी नसल्याने त्यांच्या सुविधात काही फरक असणारच हे मान्य केले तरी या सर्व लेकरांचा पृथ्वीमातेवर सारखाच अधिकार असल्याने काही लेकरांनी इतर काहींवर शक्तियुक्तीच्या बळावर अन्याय करणे व त्याना मातेकडून मिळणाऱ्या किमान लाभापासून वंचित करण्याचा प्रयत्न करणे नैतिक दृष्टचा योग्य नव्हे. ( मानवी हक्कांच्या सनदेचा उगम याच विचारसरणीत असून ती हळू हळू सर्वत्र मान्यता पावत आहे ही संतोषाची गोष्ट होय ) ही तीन कारणे लक्षात घेता आपल्या नियोजनाचे पहिले उद्दिष्ट असे असावयास हवे की ज्यामुळे प्रत्येक व्यक्तीच्या किमान मूलभूत गरजा व्यवस्थित भागविल्या जातील व इतर गरजांच्या बाब-

तीत व्यक्तीला गुणावगुणाप्रमाणे न्याय मिळेल. अधिक लायकीच्या व्यक्तींना अधिक व कमी लायकीच्या व्यक्तीला कमी सुखसोयी उपलब्ध होण्यातील विषमता अपरिहार्य होय. हे सर्व विवेचन नीट लक्षात घेतले तर असे स्पष्ट होईल की राष्ट्राच्या समृद्धतेकडे पूर्ण लक्ष ठेवूनही त्यातील प्रत्येक व्यक्तीच्या मूलभूत गरजा भागविण्याच्या कार्यास सर्वप्राथम्य देणे, व नंतर परिस्थिती जसजशी सुधारत जाईल तसतशा अधिकाधिक सुविधा सर्वांना उपलब्ध करून देणे व या सर्व कार्याचा क्रम ठरवून त्याची कांटेकोर कार्यवाही करणे म्हणजे समाजवादाच्या दिशेने वाटचाल करणे हे होय. सध्याचे शासकीय अथवा नियोजनकारांचे धोरण देशाला समाजवादाकडे नेत आहे की नाही हे ठरविण्याचा हाच निकष होय. या निकषावर ते घासून पहाता त्याचा कस किती ठरतो ?

३) समाजवादी पक्ष समाजवादाचा जो अर्थ समजतात त्या अर्थाने पाहिल्यास आपल्या शासनाने समाजवादाच्या दिशेने पावले टाकली आहेत यात शंका नाही: अधिक उत्पन्नावर प्रमाणत: अधिक कर बसविणे, वाहतुकीची साधने, दुग्धव्यवसाय, वीज उत्पादन, पोलाद कारखाने इ. व्यवसाय शासकीय क्षेत्रात चालू करणे वा ताब्यात घेणे; गरीब व उपेक्षित वर्गातील मुलांच्या शिक्षणासाठी शिष्यवृत्त्या, शुल्कमाफी इ. मार्गांनी भरीव मदत देणे, औषधे, कापड, केरोसीन, साखर, अन्नधान्य इ. च्या किंमतीवर अधिक उणे; नियंत्रण ठेवणे, शेतीवर कमाल मर्यादा घालणे, सहकारी उद्योगांना प्रोत्साहन देणे, कमी मिळकतीच्या लोकांसाठी घरे बांधणे, काही व्यवसायांसाठी किमान वेतने ठरविणे, मोठ्या बँकांचे राष्ट्रीयकरण करणे, भूतपूर्व संस्थानिकांचे तनखे व इतमाम नष्ट करणे हे उपाय समाजवादी धोरणेच दर्शवितात. धोरणांची गती मंद व कार्यवाही अर्धवट आहे इतकाच आक्षेप फारतर समाजवाद्याना घेता येईल.

माझे म्हणणे मात्र असे आहे की वरील दृष्टिकोनात साधनसाध्याची गल्लत होत आहे. साधनावरच लक्ष केंद्रित झाल्याने साध्य किती बाळसे धरीत आहे याकडे दुर्लक्ष होत आहे. सर्वांच्या मूलभूत गरजा प्रथम भागवून नंतर त्याना अधिकाधिक सुविधा उपलब्ध करून देणे, म्हणजेच प्रथम त्यांचे जीवन सुसह्य नंतर ते विविध दृष्टींनी अधिकाधिक समृद्ध बनविणे व हे करीत असतानाच विषमता कमी करण्यावर लक्ष ठेवणे हे आपले साध्य असून वरील उपाय ही साधने होत. यामुळे साध्य जवळ येत आहे की नाही हे न पाहाताच साधनांच्या कोडकौतुकात मशगुल होणे, त्याचाच डांगोरा पिटणे व त्यातच कर्तव्य-

पूर्तीचे समाधान मानणे म्हणजे आत्मवंचना व जनतेचीही दिशाभूल करणे होय. जनता अजाण असल्याने हा अप्रामाणिकपणा खपून जाईलही परंतु त्यायोगे सत्य कसे झाकणार ? राष्ट्रीयीकरणाचा बुडबुडा इंग्लंड जर्मनीत जसा फुटला तसा येथेही यथाकाल फुटेल; नव्हे आजच काही अंशी फुटला आहे. शासकीय स्वामित्वाच्या अनेक उद्योगात तोटा होत असून मजूर मालक संबंधही फारसे प्रेमाचे नाहीत. अशा स्थितीत केवळ घोषणांवर हा डोलारा किती दिवस टिकाव धरील ? दुसरे असे की सामान्य जनतेला समाजवादाचे आकर्षण, त्यायोगे आपल्या गरजा भागतील व बरे दिवस येतील या अपेक्षेमुळे वाटते. म्हणजेच गरजा भागणे ही मुख्य अपेक्षा आहे. हे काम जर इतर साधनांनी होत असेल तर समाजवादाभोवतालच्या वलयाचे तेज लुप्त होण्यास उशीर लागणार नाही. बहुसंख्य जनता केवळ समाजवादासाठी म्हणून आग्रह धरण्याचा संभव फारसा नाही. कारण समाजवाद हे तिचे साध्य नसून साधन आहे.

४) आपल्या शासनाच्या तथाकथित समाजवादी धोरणांमुळे जनतेच्या मूलभूत गरजा कितपत भागत आहेत हे ठरविण्यासाठी फार मोठ्या अभ्यासाची गरज नाही. भोवतालच्या परिस्थितीवर दृष्टिक्षेप केला तरीही ते लक्षात येण्याजोगे आहे. एक दोनच उदाहरणे पाहू. सर्वांना उदरनिर्वाहाचे साधन उपलब्ध करून देण्यात आलेले अपयश सर्वांना विदित आहेच. पहिल्या तीन योजनांमध्ये तर या बाबतीत फक्त घोषणा करण्यापलीकडे काहीच उपाय-योजनेची तरतूद नव्हती. चवथ्या योजनेत इतकेच म्हटले आहे की दहा वर्षात योजनेद्वारा निदान २० % जनतेला चालू बाजार भावानुसार किमान २० रु. दरमहा मिळतील अशी व्यवस्था करण्याचा हेतू आहे. सध्याच्या बाजारभावा-प्रमाणे २० रु. एका माणसाचे पोट भरेल की नाही हा मुद्दा बाजूला ठेवला तरी २५ वर्षांच्या नियोजनानंतर फक्त २० % जनतेला थोडाफार रोजगार उपलब्ध करून देण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या नियोजनकारांना मूलभूत गरजा भागविण्याचे महत्व कितीसे समजले आहे ? व या गरजा भागविण्याची तरतूद नसेल तर समाजवादाच्या गप्पांना कोणता अर्थ उरतो ? पाणी-पुरवठ्याची हीच कहाणी आहे. पाच लाख खेड्यात चवथ्या पंचवार्षिक योजने-अखेर पिण्याच्या पाण्याची तरतूद विहिरी खणून करण्यात येईल अशी अधिकारा-रूढ पक्षाने १९६९ च्या पक्षीय अधिवेशनात घोषणा केली होती, परंतु त्यासाठी जो पैसा उपलब्ध करून देण्याचे ठरविले त्यायोगे हे काम ४०|५० वर्षात तरी पूर्ण होईल की नाही याबद्दल नियोजनमंडळाच्या अभ्यासगटानेच

संशय व्यक्त केला आहे. देशात सर्वत्र खेडोपाडी मुख्यतः विहिरीच्या पाण्याचा पुरवठा करण्यासाठी एक हजार कोटीच्या आसपास खर्च येईल असा अंदाज आहे. प्रत्येक राज्याने दरसाल १० ते २० कोटी रु. तरी या कामासाठी खर्च करायचे ठरविले असते तर नियोजनाच्या १५।२० वर्षाच्या काळात हे काम आजपावेतो पूर्णही झाले असते. प्रत्यक्ष काम पाहिले तर मात्र ४ थ्या योजने-अखेरीस ५ लाखांपैकी जेमतेम पाऊण लाख खेड्यानाच पाणीपुरवठा उपलब्ध होऊ शकेलसे दिसते. निवाऱ्याबाबतही परिस्थिती मोठीशी आशादायक नाही. बहुधा प्रत्येक मोठ्या शहराच्या आसपास झपाट्याने वाढत असलेल्या झोपडपट्ट्यावरून व गलिच्छ वस्त्यांवरून हे कोणाच्याही लक्षात येऊ शकेल. अंगभर वस्त्रें न मिळणाऱ्यांची संख्या तर सर्वत्रच आढळून येते त्यातही जी काय वस्त्रे त्याच्यापाशी असतात ती अनेक वेळा भीक मागून वा चोरून आणलेली असतात. हे सर्व लक्षात घेऊनही शासन मूलभूत गरजांच्या बाबतीत काही करीत नाही असे मात्र माझे म्हणणे नसून त्याच्या धोरणात विवेकी क्रम नाही, त्या भागविण्याच्या कामाला प्राधान्य देण्याची पोटतिडीक नाही असा माझा मुद्दा आहे. बहुसंख्य गरिबांचे कल्याण नजरेसमोर ठेवून त्याना अन्न-वस्त्र निवारा हटकून उपलब्ध होईल असा आग्रह शासनाच्या धोरणात दिसून येत नसल्याने हे धोरण खऱ्याखुऱ्या अर्थाने समाजवादी नाही हे निक्षून सांगण्याची वेळ आता आली आहे. समाजवाद या शब्दाचा अर्थ संदिग्ध वा गुलदस्तात ठेवून जनतेची दिशाभूल करण्याचा प्रयत्न नुसता अप्रामाणिकपणाच नव्हे तर गुन्हेगारी स्वरूपाचा असल्याने अगदी चीड उत्पन्न करणारा आहे. बँक राष्ट्रीयीकरणाने अथवा संस्थानिकांच्या तनखेबंदीने समाजवादाच्या दिशेने थोडीशी वाटचाल झाली या विचाराने जनतेत उत्साहाचे वातावरण उत्पन्न झाले तरी असल्या तोटक्या व दिखाऊ उपायांनी गरिबांचे जीवन कसे सुधारणार? व ते न सुधारले तर समाजवादाचा उदोउदो करण्यात स्वारस्य काय ? म्हणून खास विनंति की नुसत्या शाब्दिक घोषणांवर भाळून न जाता समाजवादाचे वर उल्लेखिलेले निकष लावून शासकीय धोरणे तपासून पहाण्याची गरज सर्वांनीच ओळखावी. जनता याप्रमाणे करीत असल्याचे शासनाला जाणवू लागले तरच त्यांच्या धोरणात इष्ट तो बदल होईल, अन्यथा घोषणा व वल्गना यांच्या जंजाळातून बाहेर पडून खऱ्याखुऱ्या समाजवादाची वाटचाल कधी सुरू होईल ते सांगणे कठीण आहे.

शेवटी एकदोन महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करून हा लेख आवरता घेऊ. सध्या असलेल्या वा पूर्वी होऊन गेलेल्या विविध दृष्टिकोन धारण करणाऱ्या

सामाजिक तत्त्ववेत्त्यांच्या मूलभूत विचारांचा पद्धतशीर अभ्यास करणे जसे अगत्याचे आहे तसेच समाजवादाच्या दृष्टीने मार्क्स, एंगल्स, लेनिन, मावत्सेतुंग इ: कोणत्याना कोणत्या अर्थाने थोर असलेल्या पुरुषांच्या विचारांचाही अभ्यास आपल्या देशात होणे जरुर आहे. या पुरुषांच्या विचारात एकवाक्यता नसल्यास त्यांच्या अभ्यासकात तीव्र मतभेद होणे स्वाभाविकच होय. परंतु हे मतभेद उच्च अशा वैचारिक पातळीवरच राहिले पाहिजेत. ते रस्त्यावर येऊन त्यांचे पर्यवसान खून माऱ्यामाऱ्यात होणे इष्ट नाही व त्यापासून देशाचा काहीही लाभ नाही. झालाच तर तोटाच आहे इतके अवधान सर्वांनीच नेहमी राखले पाहिजे. सध्या ते निदान डाव्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांकडून तरी राखले जातेसे दिसत नाही. उपर्युक्त थोर पुरुषांनी आपापल्या देशांतील तसेच एकंदर मानवजातीच्या परिस्थितीचा अभ्यास करून स्वतःला योग्य वाटेल त्या मार्गांचा अवलंब केला, व त्यासाठी जीवन खर्ची घातले हे त्यांना खरोखरीच भूषणावह होय; मग आपल्याला त्यांचे मार्ग पटोत वा न पटोत. आपल्याकडील त्यांच्या अनुयायांकडून मात्र अशी तसदी घेतली जात असल्याचे दिसून येत नाही. गरीब व निरुपद्रवी अशा सनातन्यांची पोथीनिष्ठ म्हणून टवाळी व हेटाळणी करता करताच ही मंडळी वरील थोर पुरुषांच्या ग्रंथांचे शब्दप्रामाण्य मानून आपले विचार वा धोरणे निश्चित करण्याचा प्रयत्न करताना पाहिले म्हणजे हसूच येते. हीही पोथीनिष्ठा नव्हे तर काय ? पोथ्या बदलल्या तरी निष्ठा तीच. घोडे बदलले तरी घोडेस्वार तो घोडेस्वारच. त्याला आकाशात मुक्त संचार करणाऱ्या वैमानिकाची सर कशी येणार ? या वैचारिक गुलामगिरीतून मुक्त होऊन स्वतंत्रपणे देशस्थितीचा अभ्यास व विचार करण्याची कास धरण्यास आपल्या विचारवंतानी आता शिकले पाहिजे. या योगेच त्यांना आपल्या देशातील परिस्थितीचे यथायोग्य आकलन होईल व ती सुधारण्याचे मार्ग दिसू लागतील. मग ते मार्ग अगदी नवीन असोत किंवा वरील सारख्या विचारवंतांच्या मार्गांशी मिळते जुळते असोत. समाजवादाचा अर्थ व त्याप्रत जाण्याचे मार्ग या बाबतीतही हाच मुद्दा लागू आहे. मार्क्स, लेनिन, स्टॅलिन व मावत्सेतुंग ही सर्वच मंडळी समाजवादी अथवा साम्यवादी असली तरी त्यांच्या-पैकी प्रत्येकानी या वादाचा अर्थ सारखाच केला नाही व एकच धोपटमार्गही अवलंबिला नाही. परिस्थितीप्रमाणे अर्थाला मुरड घालून व आपापल्या प्रदेशातील परिस्थितीला अनुरूप खास स्वतःची अशी भर घालून त्यांनी त्या ध्येयाप्रत पोचण्याचे मार्ग निश्चित केले. आपल्याकडील समाजवादी विचारवंत मात्र अशी तसदी क्वचितच घेताना दिसतात. ते आपला वैचारिक

संसार बहुधा उसनवारीवर थाटतात. हे प्रज्ञावंतांचे लक्षण आहे असे कसे म्हणावे ? तसेच ते राष्ट्राच्या अस्मितेला शोभते का ? समाजवाद म्हणजे काय व त्याकडे नेणारे मार्ग कोणते यासाठी 'भाष्यकाराते वाट पुसत,' म्हणून मार्क्स ते माओपर्यंतच्या अग्रणी विचारवंतांची विचारसरणी जरूर अभ्यासली पाहिजे परंतु त्याचबरोबर आपल्या देशातील विशिष्ट परिस्थिती सूक्ष्मपणे न्याहाळून तिला योग्य असा अर्थ व मार्ग निश्चित करणे हे खरे महत्त्वाचे आहे. सहज सुचलेले उदाहरण सांगतो. सध्या बहुधा स्मृतिशेषही नसलेल्या एका विचारवंताने सुमारे ४०–४५ वर्षांपूर्वी नाशिक येथे एका व्याख्यानात साम्यवादाची पुढीलप्रमाणे अगदी अर्थपूर्ण व्याख्या सांगितली होती : 'समाजात कोणीही गरीब असता उपयोगी नाही, समाजात कोणीही श्रीमंत असता उपयोगी नाही व एकंदर समाज मात्र गबर असला पाहिजे' हे साधण्याचा मार्ग हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय नव्हता.

वरील व्याख्येच्या मागोव्याने सद्यस्थिती तपासल्यास आपण समाजवादाच्या दिशेने जात आहोत की नाही याचा चटकन बोध होईल. त्याकरिता जाडजूड ग्रंथाच्या शब्दांचा कीस काढण्याची अथवा मार्क्सआदी विचारवंतांना साक्षी काढण्याचीही जरूर नाही. तीन चार पंचवार्षिक योजनामुळे देशातील संपत्ती वाढत असल्याने समाज गबर होत आहे यात शंका नाही. शासक व नियोजनकारांना याचे योग्य ते श्रेय दिलेच पाहिजे तसेच हे कार्य असेच नेटाने व वेगाने पुढे जाईल हेही पाहिले पाहिजे. व्यक्तीच्या संदर्भात मात्र असे म्हणणे कठीण आहे. एकीकडे लग्नमुंजीच्या प्रसंगीही लक्षभोजने सहज घालण्याइतकी संपत्ति दुथडी भरून वहात असतानाच असंख्य लोक भीक मागून व उष्टेमाष्टे खाऊन धड लज्जा राखण्यासही अपुऱ्या वस्त्रानिशी जीवन कसेबसे कंठीत आहेत. म्हणजेच समाजात अतिश्रीमंत व अतिगरीब यांच्यात विषमतेची डोळे फिरवून टाकणारी भयानक दरी पसरलेली आहे. दैववादी तत्त्वज्ञान हाडोमासी खिळलेले नसेल तर या भीषण परिस्थितीतून हिंसक क्रांतीची ठिणगी पडण्यास उशीर लागला नसता. २०–२५ वर्षांच्या नियोजनानंतर ही स्थिती असल्याने घोषणा काहीही असल्या व जनता स्वतःची कितीही दिशाभूल होऊ देत असली तरी व्यक्तिगत जीवनाच्या दृष्टीने आपले पाऊल समाजवादाच्या दिशेने अद्याप फारसे पुढे पडलेले नाही हे मान्य करावेच लागेल. या खेदजनक परिस्थितीचे उत्तरदायित्व शासनकर्त्या पक्षावरच असून ती सुधारणे हेही त्यांचेच कर्तव्य

आहे. गरीब व श्रीमंतांप्रमाणेच शासन व जनता यातही मोठी दरी पसरलेली दिसते व त्यामुळेच शासन सर्व करील व आपण फक्त उपभोगाचे धनी ही वृत्ति प्रसार पावत आहे. यात सुधारणा होण्याचा मार्ग एकच व तो म्हणजे शासन व जनता एकच आहेत हे जनतेच्या गळी उतरवून तिला सक्त मेहेनतीला जुंपणे व कोणाचीही संपत्ति अमूक पातळीपलीकडे वाढण्यापूर्वी सर्वांच्या मूलभूत गरजा पूर्ण करण्याची कोशीस करून नंतर सामाजिक न्यायाच्या दिशेने गाडा पुढे नेणे.

देशांत खऱ्याखुऱ्या समाजवादाचे युग अवतीर्ण करण्यासाठी जरूर ती कुवत व तडफ आपल्यामध्ये असल्याचा निश्चित स्वरूपाचा पुरावा श्रीमति इंदिराबाईनी आपल्या कर्तृत्वाने जनतेला दिला असून जनतेनेही गेल्या निवडणुकीत त्यांना उत्स्फूर्त व भरघोष पाठिंबा देऊन त्या कर्तृत्वाला साद देण्याची मनीषा निःसंदिग्धपणे व्यक्तविली आहे. यामुळे यापुढील काळात जनता व शासन यांतील ही भयानक दरी नष्ट होण्याचा संभव दृष्टिपथांत आला आहे. पांचवी पंचवार्षिक योजना सध्यां ऐरणीवर असून ती लवकरच जनतेपुढे येईल. अशा स्थितीत समाजवादाबाबत देशांतील विचारांना सुस्पष्ट वळण मिळून त्यांचे प्रतिबिंब या योजनेत दिसून यावे व तिच्या कार्यवाहीनंतर देशाचे पाऊल समाजवादाच्या दृष्टीने निश्चितपणे पुढे पडले आहे हे जनतेच्या प्रत्ययाला व्यावहारिक स्वरूपात यावे हीच एकमेव इच्छा.

◆ ◆ ◆

अनु० किशोर मोरेश्वर फडके

# मानसोपचारशास्त्राच्या दृष्टिकोणातून मनुष्याचे मूल्य

( सुप्रसिद्ध अमेरिकन मानसोपचारतज्ज्ञ डॉ. अल्बर्ट एलिस यांच्या The value of a human being: A psychothesrapeutic appraisl या लेखाचा स्वैर अनुवाद )

बुद्धिनिष्ठ जीवन जगण्याचे एक मूलभूत तत्त्व आहे. ते तत्त्व असे की माणसांनी आपली स्वतःची श्रेष्ठता अथवा कनिष्ठता आपल्या कर्तृत्वाच्या भाषेत न करता स्वतःचा संपूर्ण स्वीकार स्वतःच्या अस्तित्वाच्या, सजीवतेच्या भाषेत केला पाहिजे. नाही तर त्यांचा कल कठोर आत्मनिंदा करण्याकडे व असुरक्षित वाटण्याकडे राहील आणि परिणामतः ते अकार्यक्षम होतील.

असा परिणाम का बरे अपरिहार्य आहे ? कारण असे की स्वतःचे मूल्यमापन स्वतःच्या कृत्यांनुसार अथवा कर्तृत्वानुसार करावयाचे म्हटले तर जोपर्यंत आपण पुष्कळ अंशी कार्यक्षम असू तोपर्यंतच सर्व ठीकठाक होईल. जरी असे कार्य अथवा वर्तन क्षणमात्र अत्युत्कृष्ठ असले तरी ते कमी प्रशंसनीय होण्यास बहुधा फक्त थोड्या कालावधीची गरज असते. जशी जशी वर्षामागून वर्षे जाऊ लागतात तसा तसा मनुष्य वृद्ध होतो व परिणामी ज्या वेगवेगळ्या गोष्टी तो तरुण असताना चांगल्याप्रकारे करू शकत होता त्या अखेर वाईट प्रकारे करू लागतो. शिवाय सर्वस्वी परिपूर्ण कोणीच नसतो; आणि बोलून चालून प्रमादशील असल्यामुळे आपण सर्वच कधी ना कधी पुष्कळ बाबतीत अपयशी होतो. मग जे स्वतःचे मूल्यमापन स्वतःच्या कर्तृत्वानुसार करण्याचा आग्रह धरतात त्यांची काय स्थिती होईल ?

एखाद्या मनोवांछित उद्दिष्टाच्या प्राप्तीकरता धडपडण्यात अखेरीस अयशस्वी होण्याची शक्यता सामान्यतः बरीच जास्त आहे हे माहीत असले की

माणसांची प्रवृत्ती अशा अपयशाच्या शक्यतेची अवास्तव काळजी करण्याकडे असते. आणि ही काळजी करण्याची प्रवृत्ती यशस्वी होण्याच्या मार्गात वारंवार अडथळा आणते. कारण काळजी चित्त विचलित करते; वेळेचा अपव्यय करते आणि समस्या परिहारासाठी तिचा माणसाला क्वचितच उपयोग होतो. उलट-पक्षी काळजी बहुधा नेहमीच विनाशकारक ठरते.

कोणत्याही कार्यात माणसाने आपले मनुष्य म्हणून वैयक्तिक मूल्य गुंत-विले की ते कार्य करण्याचा प्रयत्न करणे भयंकर धोकादायक ठरते. हाती घेतलेल्या कामात अपयश आले म्हणजे स्वतःचा पराजय झाला अशी व्याख्या एखाद्याने केली तर आखाड्यात उतरण्यास तो नाखुष होईल. आणि म्हणून त्याचा कल सबबी शोधण्याकडे व काम टाळण्याकडे राहील. किंवा त्याने साम-न्यात उडी घेतली व स्वतःला प्रयत्न करावयास भाग पाडले तर तसे करीत असताना तो "मी यशस्वी होईन ना?" अथवा "माझे कार्य निदान किमान दर्जापर्यंत तरी पोचेल ना?" याची काळजी करीत राहील. बहुतांशी हाती घेतलेले काम करण्यात त्याला इतका थोडा आनंद वाटेल, आणि ते काम तडीस नेण्यासाठी लागणारी चिकाटी शाबूत ठेवणे हेच त्याला इतके अवघड काम वाटेल, की अखेर तो काहीसा असा निष्कर्ष काढेल : "छे बुवा इतकी तकलीफ घेण्याच्या लायकीचे हे काम नाही आणि असले काम नाही तरी कोणा लेकाला करावयास हवे आहे?" याचा परिणाम बहुधा असा होतो की माणूस अंगीकारलेल्या कामापासून परावृत्त होतो; व कोणताही वस्तुनिष्ठ पुरावा नसताना अशी दृढ कल्पना करून घेतो की खरोखर इतकी धडपड करण्याच्या योग्यतेचे ते काम नाही!

उदाहरणार्थ, एखाद्या कलावंताला उत्तम चित्रकार होण्याची अतोनात इच्छा असेल तर धडपड करण्यासाठी त्याला एक छानदार ध्येय गवसेल; आणि अशी धडपड करण्यात त्याला बहुधा एक आगळाच आनंद मिळेल, पण थोर चित्रकार होणे त्याला अनिवार्य वाटत असेल आणि त्याची अशी ठाम समजूत झाली असेल की त्याने अत्युत्कृष्ठ चित्रकार झालेच पाहिजे नाहीतर माणूस म्हणून त्याला काही किंमत नाही, तो अमानुष, क्षुद्र किडा आहे तर लवकरच अशी वेळ येईल की चित्र काढणे त्याला धोक्याचे वाटेल. कारण आपण नालायक आहोत हे सिद्ध करायला कोणाला आवडेल? आणि असा धोका पत्करण्याऐवजी हा होतकरू चित्रकार शेवटी सबबी सांगेल. तो म्हणेल "मला चित्र काढण्यास वेळ नाही; माझ्याजवळ पैसेही नाहीत; माझ्या

खांद्यात अशी काही उसण भरली आहे की चित्रे काढणे मला अशक्यच होऊन बसले आहे. आणि मी काढतो तसली चित्रे नाही तरी आजकाल कोणाला हवी आहेत ? तेव्हा ती काढून काय उपयोग ? ''

जर माणसाला त्याचे स्वत्व, वैयक्तिक मूल्य अथवा अहंता मोजायचीच असेल तर तसे कोणत्या तरी अगदी विश्वसनीय प्रमाणानुसार करावे हे बरे. उदाहरणार्थ, त्याचे अस्तित्व अथवा सजीवत्व हे प्रमाण पाहा. या प्रमाणानुसार तो असे वाजवी अनुमान काढू शकेल की मी चांगला आहे कारण कोणत्याही गोष्टीत मी यशस्वी होतो म्हणून नाही, किंवा काही लोक मला चाहतात म्हणूनही नाही, तर केवळ मी जिवंत आहे, मी अस्तित्वात आहे म्हणून मी चांगला आहे. कारण जेव्हा तो स्वतःची मनुष्य म्हणून लायकी, अस्तित्वाच्या किंवा सजीवतेच्या भाषेत मान्य करू लागेल, तेव्हा तो अर्थातच स्वतःचा स्वीकार त्याच्या जीवनात येणाऱ्या जवळ जवळ कोणत्याही परिस्थितीत करू शकेल. या कसोटीनुसार तो मृत्यू पावेल तेव्हाच त्याची लायकी संपेल !

स्वतःच्या मूल्याच्या प्रश्नाला तर्कशुद्ध उत्तर म्हणजे स्वतःचे मूल्यमापन सजीवतेच्या, अस्तित्वाच्या निकषावर करणे. हे उत्तर Paul Tillich, Robert S. Hartman आणि इतर अस्तित्ववादी तत्त्ववेत्त्यांच्या विचार-प्रणालीतून निपजले आहे. विवेकनिष्ठ मानसोपचारपद्धतीच्या विकासावर Hartman यांचा प्रभाव फार मोठा आहे; कारण Perry London आणि इतर वेगवेगळ्या मानसोपचारतज्ज्ञांनी निदर्शनास आणले आहे त्याप्रमाणे मानसोपचारपद्धती ही बहुतांशी नीतितत्त्वांशी व मूल्यांशी संबंधित आहे; मग मानसोपचारतज्ज्ञ ही गोष्ट जाणीवपूर्वक मान्य करीत असोत वा नसोत. आणि कार्यक्षम मानसोपचारतज्ज्ञाजवळ स्वतःचे चांगले जीवन-तत्त्वज्ञान असावयास पाहिजे; आणि त्याच्याकडे येणाऱ्या मनोरुग्णांशी तात्त्विक प्रश्नावर सखोल चर्चा करण्याचे सामर्थ्य त्याच्यापाशी असले पाहिजे.

परंतु दुर्दैवाने, माझ्याकडे येणाऱ्या रोग्यांवर मानसोपचार करण्यासाठी Tillich आणि Hartman यांच्या विचारसरणीवर आधारित अशा दृष्टि-कोणाचा मी जेवढ्या अधिक प्रमाणात वापर करू लागलो व त्यांना दाखवून देऊ लागलो की त्यांचे वर्तन कितीही असमाधानकारक असले, व त्यांच्या सभोवतालच्या इतर महत्त्वाच्या माणसांना त्यांच्याबद्दल जरी काहीच पर्वा वाटत नसली तरी रोग्यांनी स्वतःला मनुष्य म्हणून क्षुद्र समजण्याचे खरोखरी काहीच कारण नाही. तेवढ्या अधिक प्रमाणात माझ्या आढळात असे हुशार

रोगी आले की जे माझे वरील विचार खपवून घेण्यास तयार नव्हते; किंवा निदान त्यांना वरील विवेचनाबद्दल काही गंभीर व तात्त्विक अडचणी भासत होत्या. असे रोगी पुढीलप्रमाणे हरकत घेऊ लागले. "डॉ. एलिस, तुम्ही म्हणता की माणूस केवळ जिवंत आहे म्हणून तो चांगला आहे; आणि स्वतःचे मूल्य ठरविण्यास त्याला दुसऱ्या कोणत्याच गोष्टीची आवश्यकता नाही हे तत्त्व मान्य केल्यास त्याचा माणसाला काय फायदा होईल ते मी समजू शकतो. जर एखादा माणूस खरोखरच या तत्त्वावर विश्वास ठेवील तर त्याचे स्वतःचे बरेचसे वर्तन तितकेसे चांगले नसते, नव्हे ते निंदास्पद असते हे मान्य करूनसुद्धा तो स्वतःला खऱ्या अर्थाने क्षुद्र लेखू शकणार नाही. परंतु मनुष्य केवळ जिवंत आहे म्हणून तो चांगला आहे असे तुम्ही निर्विवादपणे कसे काय म्हणू शकता? तुम्ही ही सिद्धांत–कल्पना सिद्ध कशी करू शकता? मनुष्य जिवंत आहे, ठीक आहे; तुम्ही ही गोष्ट हमखासपणे प्रात्यायिक पुराव्याने सिद्ध करू शकाल. परंतु तो जिवंत आहे म्हणून तो चांगला आहे किंवा मूल्यवान कसा ठरू शकतो? तुम्ही तितक्याच सयुक्तिकपणे असेही म्हणू शकता की तो जिवंत आहे म्हणून तो वाईट आहे. कारण, तो जिवंत आहे म्हणून तो चांगला आहे अथवा तो जिवंत आहे म्हणून तो वाईट आहे, ही दोन्ही विधाने म्हणजे व्याख्या आहेत; पुनरुक्तिवाचक विधाने आहेत आणि त्यापैकी कोणतेच विधान खरे पाहता सिद्ध करता येण्यासारखे नाही."

मी जेव्हा अशा रोग्यांचा युक्तिवाद ऐकला तेव्हा. "ठीक आहे. तुमचे म्हणणे बरोबर आहे. मनुष्याचे जिवंतपण म्हणजेच त्याचा चांगुलपणा किंवा मूल्य हे मी सिद्ध करू शकत नाही" असे मान्य करण्याशिवाय मला गत्यंतरच नव्हते. मात्र एखाद्या रोग्याने तो जिवंत आहे व तो अयोग्य वर्तन करतो म्हणून निर्विवादपणे तो कवडीमोल आहे, त्याला स्वतःला स्वतःपुरतीही काहीच किंमत उरत नाही व म्हणून तो मरून जाण्यास योग्य आहे असे गृहीत धरले तर ते गृहीत तत्त्व खोटे आहे असे मी सिद्ध करू शकतो. कारण त्याचे हे गृहीत तत्त्व म्हणजेही एक व्याख्या आहे पुनरुक्तीचा दोष करणारे विधान आहे आणि ते शाबित करावयास अनुभवाश्रित पुराव्याचा काहीच आधार नाही. परंतु मनुष्याला अंगभूत., स्वाभाविक मूल्य आहे हे मी कसे सिद्ध करणार?

"माझे मूल्य काय?" अथवा "मी चांगला माणूस आहे हे मी कसे सिद्ध करावे?" या प्रश्नांना खरोखरच काही उत्तर नाही; कारण मुळात हे प्रश्नच काहीसे अर्थहीन व मूर्खपणाचे आहेत. मी जर स्वतःला विचारले की

मी काय करतो ? माझे गुणविशेष कोणते ? किंवा माझ्या या कार्याची किंमत काय ? तर तो प्रश्न अर्थपूर्ण आहे. कारण तो प्रश्न गुणविशेष, कार्य याबद्दलची माहिती विचारतो आणि अशा गोष्टींची माहिती १) निरीक्षणाने मिळविता येते व २) काही अंशी तिचे मोजमापन करता येते, किंवा मूल्यमापन करता येते. उदाहरणार्थ, मी टेनिस खेळतो; तो खेळ खेळताना काही विशिष्ट प्रकारचे फटकारे मी छानदारपणे मारतो; आणि माझा आजचा टेनिसचा खेळ सुरेख झाला कारण माझ्या प्रतिस्पर्ध्याबरोबर मी जेवढे सामने खेळलो ते सर्व सामने मी जिंकलो. ही सर्व विधाने वस्तुस्थिती निदर्शक आहेत. परंतु मी स्वतःला विचारले की मी कोण आहे तर या प्रश्नाला फक्त माझे काही गुणविशेष, लक्षणे व कृती यांच्या पलीकडे मी कोणत्या भाषेत उत्तर देऊ शकणार ? अशा अस्पष्ट, संदिग्ध व काहीशा अर्थशून्य प्रश्नाला मी उत्तर द्यावे तरी कसे ?

म्हणजे David Bourland म्हणतात त्याप्रमाणे माझे 'असणे' यात निरीक्षण करण्यासारखे व मोजता येण्यासारखे काहीच नाही. 'असणे' या क्रियापदाचा आपण जेव्हा जेव्हा उपयोग करतो तेव्हा स्वतःबद्दल अतिव्याप्तीची विधाने करण्याकडे आपला कल असतो. जरी मी भोंगळपणे स्वतःला टेनिसपटू असे नामाधिकरण केले तरी वस्तुतः मी टेनिसपटू नसतो. खरे पाहता मी एक असा मनुष्य आहे की जो इतर गोष्टी करतो त्याप्रमाणे कधी कधी टेनिसही खेळतो. तसेच मी त्या खेळातला विशिष्ट फटकारा मारणारा उत्तम खेळाडूही नसतो. मी फक्त एक प्राणिमात्र आहे, मनुष्य आहे की ज्याच्या जवळ टेनिस खेळण्यास लागणारे अनेक सामान्य ( व काही असामान्य ) गुण आहेत. उदाहरणार्थ, चापल्य, हस्तकौशल्य इत्यादी. आणि माझा आजचा टेनिसचा खेळ विशेष छान झाला म्हणून मी थोर टेनिसपटूही नाही. जास्त बिनचूकपणे बोलायचे म्हणजे मी एक माणूस आहे, प्राणी आहे की जो आज सुरेख खेळला आणि जो उद्या फार वाईटप्रकारे खेळू शकेल, आणि परवा परत सुरेख खेळू शकेल. मी जर काही 'असेन' तर मी एक फार गुंतागुंतीचा प्राणी आहे; आणि माझा उल्लेख धोपटपणे टेनिसपटू, मानसशास्त्रज्ञ, लेखक किंवा अशा कोणत्याही प्रकारे करणे हे जरासे मूर्खपणाचे व फसवेपणाचे आहे. म्हणून बिनचूकपणे बोलायचे म्हणजे मी असा माणूस आहे की जो वेगवेगळ्या गोष्टी करतो. तेव्हा मी कोण आहे ? असा प्रश्न माझ्याबद्दल विचारणे वेडगळपणाचे आहे. माझे गुणविशेष कोणते आणि वेगवेगळ्या वेळी मी ते कसे कार्यान्वित करतो असा प्रश्न विचारणे बरेच जास्त सयुक्तिक आहे.

त्याचप्रमाणे माझे स्वत्व कशात आहे? या प्रश्नाला जरी Erik Erikson यांनी उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे, तरी मला वाटते की हा बराचसा अर्थहीन प्रश्न आहे. कारण अशा प्रश्नाला देण्यासारखे फक्त एकच उत्तर असते. आणि ते म्हणजे मी पुरुष आहे, किंवा मी अमेरिकन तरुण आहे, किंवा मी मानसशास्त्रावरील पुस्तके लिहिणारा लेखक आहे. आणि ही सर्व फसवी अतिव्याप्त विधाने आहेत. खरे पाहता मी मनुष्य आहे. आणि मी अगणित गोष्टी करतो. त्यांपैकी काही योग्य प्रकारे करतो तर काही वाईट प्रकारे करतो. आणि माझे वर्णन डाव्या विचारसरणीचा, मानसोपचारतज्ज्ञ, संगीतज्ज्ञ किंवा अशा प्रकारच्या अतिव्याप्त किंवा अव्याप्त परिभाषेत योग्यप्रकारे करता येणार नाही. जेव्हा मी अशा प्रकारची परिभाषा स्वतःचे वर्णन करण्यासाठी वापरतो तेव्हा मी एक प्रकारची लघुलिपी वापरीत असतो; आणि तीसुद्धा अशी अशुद्ध लघुलिपी की ज्यामुळे माझे खरे गुणविशेष कोणते हे उघड होण्याऐवजी बहुधा ते अस्पष्टच होतात.

शिवाय मी जेव्हा विचारतो की माझे स्वत्व कशात आहे? तेव्हा प्रामाणिकपणे बोलायचे झाले तर मी विचारीत असतो की इतरांशी तुलना करता मी कसा आहे? ज्या समूहाचा मी घटक आहे (म्हणजे उदाहरणार्थ, मध्यम-वयस्क अमेरिकन लोकांचा) तो समूह, तू ज्या समूहाचा घटक आहेस त्या समूहाच्या निदान तोडीचा तरी आहे ना? किंवा अधिक चांगले म्हणजे तुझ्या समूहापेक्षा श्रेष्ठ असलेल्या समूहाचा मी घटक आहे ना? तुझ्या स्वत्वाशी तुलना करता माझे स्वत्व अस्सल, प्रामाणिक व उत्तम आहे ना? माझ्या खास स्वत्वामुळे मी जिवंत राहण्यास व समृद्धी उपभोगण्यास लायक आहे तर तू दुर्बळ होऊन मरून जाणेच उचित नाही का? मी कोण आहे व माझे स्वत्व कशात आहे या प्रश्नाचा (जसे Erikson कधी कधी सूचित करतात असे दिसते त्याप्रमाणे) असा अर्थ होऊ शकतो की माझी केवळ असे जाणून घेण्याची इच्छा आहे की माझे गुणविशेष कोणते आहेत? म्हणजे त्या ज्ञानाच्या साहाय्याने मी स्वतः माझ्या शे–पाऊणशे वर्षांच्या आयुष्यात जास्त आनंद उपभोगीन. परंतु बहुधा हा प्रश्न म्हणजे आत्मश्रेष्ठत्व सिद्ध करण्याच्या शर्यतीचा प्रकार असतो. अशा शर्यतीत मी प्रांजलपणे असे सिद्ध करण्याच्या आशेत असतो की मी थोर आहे व तू नाहीस; जग माझा यथोचित सन्मान करील आणि तुला शिव्यांची लाखोली वाहील; आणि अखेर आज ना उद्या मी स्वर्गात जाईन पण तू मात्र हीनपणे नरकात होरपळत पडशील.

वस्तुत: ज्याला आपण स्वाभिमान, किंवा स्वत:बद्दल योग्यतेची भावना किंवा आत्मबळ म्हणतो त्याच्या मुळाशी एक कल्पना असते. ती अशी की मला सिद्ध करायचे असते की मी चांगला आहे आणि तू, म्हणजे उरलेले सर्व जग, चांगले नाही. मी चांगला आहे म्हणून मी जिवंत राहण्यास व सुख उपभोगण्यास लायक आहे आणि म्हणून अखेर मी कोणत्यातरी प्रकारची मुक्ती मिळवीन. जेव्हा मला चांगल्या आत्मबळाची प्रचीती येते तेव्हा मला फक्त जिवंत राहून सुख उपभोगायचे नसते तर मला स्वत:ला सैतानलोकांतून काढून घेऊन देवपणास न्यावयाचे असते.

तुम्ही म्हणाल ठीक आहे. हे सर्व खरे असेलही. परंतु शतकानुशतके ज्ञानी माणसे सांगत आली आहेत त्याप्रमाणे जगराहटीची ही स्थिती अपरिहार्य नाही का ? मनुष्य अहंकाराशिवाय, स्वाभिमानाशिवाय, गर्वाशिवाय, आत्मश्रेष्ठत्वाच्या भावनेशिवाय किंवा अशाच प्रकारच्या इतर कोणत्याही भावनेशिवाय खरोखरच जीवन समाधानाने जगू शकेल काय ?

जेव्हा मला समजले की माझ्या रोग्याची तो केवळ जिवंत आहे म्हणून चांगला आहे अशी खात्री पटवून देणे सोपे नाही तेव्हा मी त्याला म्हणालो "का नाही जगू शकणार ? अलबत जगू शकेल. जसे तू खरोखर लायक माणूस आहेस हे मला सिद्ध करता येत नाही तसेच तू लायक नाहीस असे तूही सिद्ध करून दाखवू शकत नाहीस. कारण या वादात आपण ज्या काही प्रमाणांचा उपयोग करतो आहोत असे वाटते ती सर्व प्रमाणे पुनरुक्तीचा दोष करणारी आहेत. मी म्हणतो तू केवळ जिवंत आहेस म्हणून तू चांगला आहेस; आणि तू मला योग्य रीतीने दाखवून देत आहेस की ही केवळ माझी माणसाच्या मूल्याची अथवा चांगुलपणाची व्याख्या आहे. आणि तू म्हणतोस की तुझ्या कृती वाईट आहेत म्हणून तू नालायक आहेस. यावर मी रास्तपणे दाखवून देत आहे की ही केवळ तुझी नालायकपणाची व्याख्या आहे. आपल्या या वादातून काहीच निष्पन्न होत नाही. कारण आपल्या मुद्यांना काहीच प्रात्यायिक संदर्भ नाही. परंतु तुझ्या मूल्याबद्दल विचार करण्याची अथवा त्याला नाव देण्याची मुळी जरूरच काय ? अशा काही संकल्पनेची आवश्यकताच काय?"

"का बरे ? अशी संकल्पना आपल्याला नको काय ? जो मनुष्य स्वत:चे मूल्यमापन कधीच करीत नाही, स्वत:चा गौरवही करीत नाही अथवा स्वत:चा तिरस्कारही करीत नाही असा मनुष्य मी कल्पूच शकत नाही."

"का नाही ? मनुष्याने स्वतःचे मूल्यमापन करण्याचे प्रमाण शोधून काढलेच पाहिजे ते का म्हणून ?"

"का म्हणजे ? तो कार्यक्षम राहून जीवन जगू शकेल म्हणून."

कार्यक्षमतेने ? मी म्हणतो ही तर निरर्थक बडबड आहे. जितका तो स्वतःचे मूल्यमापन करू लागेल तितका तो अकार्यक्षम होण्याची शक्यताच जास्त आहे. एकतर स्वतःचे असे मूल्यमापन करण्यात तो बराच किंवा बहुतांशी सर्व वेळ व शक्ति खर्च करील. दुसरे असे की त्याला कधी बिनचूक व सुसंगत उत्तर मिळणार नाही. तिसरी गोष्ट अशी की तो अतिशय प्रमादशील व कमालीचा परिपूर्णतावादी असल्यामुळे अखेरीस स्वतःला पुष्कळ अंशी उणाच लेखील व अशा प्रकारे स्वतःच्या कार्यात अडथळा निर्माण करील. या सर्वांचा कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीने फायदा तो काय ?

"तुम्ही काय म्हणता ते माझ्या लक्षात आले, परंतु तरीसुद्धा मनुष्य स्वतःचे मूल्यमापन करण्याचे पूर्णपणे कसे टाळू शकेल ते मला कळत नाही."

"ठीक आहे कसे ते मी तुला सिद्ध करून देण्याचा प्रयत्न करतो." मी निश्चयपूर्वक प्रत्युत्तर देतो; व नंतर मी रोग्याला असे दाखवून देण्याचा प्रयत्न करतो की माझा मुद्दा समजवून घेण्यासाठी त्याला जर काही करणे आवश्यक असेल तर ते इतकेच की पूर्णपणे प्रात्यायिक पातळीवर रहाणे व खालीलप्रमाणे स्वतःच्या जीवनाकडे पाहणे.

१. एक गोष्ट स्पष्ट आहे व ती म्हणजे तो अस्तित्वात आहे आणि ही गोष्ट अगदी सहजपणे निरीक्षणाने ठरविता येईल, व दुसऱ्यांच्या निरीक्षणाशी पडताळून पाहता येईल.

२. तो जिवंत रहाणे पसंत करू शकतो; किंवा स्वतः मरण पतकरू शकतो. हा झाला प्रात्यायिक पद्धतीने निरीक्षण करता येण्याजोगा दुसरा पर्याय.

३. जर तो जिवंत राहणे पसंत करेल तर दुःखापेक्षा जास्त सुख मिळविण्याची धडपड करू शकेल किंवा सुखापेक्षा जास्त दुःख मिळविण्याची धडपड करू शकेल. हा झाला तिसरा प्रात्यायिक पद्धतीने ठरविता येण्याजोगा पर्याय.

४. जर तो जिवंत रहाण्याच्या व सुख मिळविण्याच्या बाजूने खालील गृहीत तत्त्वानुसार निर्णय घेऊ शकतो. जिवंत रहाणे व आनंदी राहणे मला हितावह आहे. किंवा दुसरे गृहीत तत्त्व असे मांडता येईल की मी

चांगला आहे व म्हणून मी जिवंत राहण्यास व सुखाचा उपभोग घेण्यास पात्र आहे. जर त्याने पहिल्या गृहीत तत्वानुसार निर्णय घेतला तर स्वतःचे मूल्यमापन करण्याचे टळेल. अर्थात तरीसुद्धा तो स्वतःच्या कार्याचे मूल्यमापन जरूर करील. उदाहरणार्थ, जिवंत राहणे व आनंद उपभोगणे या कार्यांचे मूल्यमापन करता येईल. जर त्याने दुसऱ्या गृहीत तत्त्वानुसार निर्णय घेतला तर तो स्वतःची अहंता वा स्वत्व यांचा प्रश्न निर्माण करील व स्वतःचे मूल्यमापन करील.

५. स्वतःचे कोणत्याही प्रकारचे मूल्यमापन न करता तो असा निर्णय घेऊ शकेल की जिवंत राहावे व जेवढा मिळविता येईल तेवढा जीवनातील आनंद उपभोगावा. त्यामुळे स्वतः संबंधीचे त्यांचे मुख्य प्रश्न " मी कोण आहे ? माझे स्वत्व कशात आहे ? किंवा माझे मूल्य काय ? " असे उरणार नाहीत. उलटपक्षी ते प्रश्न काहीसे असे राहतील : माझे गुणविशेष कोणते ? कोणत्या गोष्टी करणे मला आनंददायक वाटते व कोणत्या गोष्टी करणे मला आनंददायक वाटत नाही ? मी माझे गुणविशेष कसे जोपासावेत म्हणजे मी जिवंत राहीन व अधिकात अधिक समाधानकारक जीवन जगेन ?

माझ्या रोग्यांबरोबर चर्चा करताना मुख्यतः मी पुढील मुद्यावर भर देतो. जर तुम्हाला स्वतःचे मूल्यमापन करावयाचेच असेल अथवा सामान्यतः ज्याला आत्मसामर्थ्य सिद्ध करण्याचे खेळ म्हणता येतील ते खेळावयाचेच असतील — आणि मी तुम्हाला आग्रहपूर्वक असा सल्ला देतो की तुम्ही तसे करू नका — तर तुमच्या स्वतःच्या मूल्याच्या प्रश्नाला एक साधे उत्तर आहे. फक्त तुम्ही स्वतःची चांगला, लायक किंवा मूल्यसंपन्न अशी व्याख्या तुमच्या अस्तित्वाच्या किंवा जिवंतपणाच्या शब्दात करा म्हणजे झाले. ठामपणे स्वतःला सांगा " मी जिवंत आहे; आणि मी लायक आहे, कारण मी जिवंत आहे. " जर तुम्ही या साध्या सूत्रावर मनापासून विश्वास ठेवाल तर ते सूत्र फार उपयुक्त ठरेल; आणि या सूत्राचे खंडण करणे जवळ जवळ अशक्य आहे. कारण यावर विश्वास ठेवलात तर जिवंत आहात तोपर्यंत तुम्ही कधीही कमालीचे चिंताग्रस्त होणार नाही; किंवा स्वतःची निंदा करणार नाही. आणि जेव्हा तुम्ही मृत्यू पावाल तेव्हा तुम्ही काळजी करण्याचा प्रश्नच नाही !

परंतु जर तुम्हाला माणसाच्या मूल्याच्या प्रश्नाला अधिक समाधानकारक उत्तर हवेच असेल—आणि मी असा निश्चित सल्ला देतो की असे उत्तर शोधण्याचा तुम्ही कसोशीने प्रयत्न करा — तर मग तुम्ही स्वतःचे मूल्यमापन

करण्याचे सोडून द्यावे हे बरे. तुम्ही चांगलेही नाही अथवा तुम्ही वाईटही नाही. तुम्ही फक्त तुम्ही आहात. तुमच्याजवळ कित्येक गुणविशेष आहेत त्यांपैकी बहुतेकांचे तुम्ही मोजमापन करू शकता– नव्हे तुम्ही तसे केलेले बरे. उदाहरणार्थ, तुमची वाचन करण्याची, बोलण्याची, लेखन करण्याची, पळण्याची, उडी मारण्याची, मोटार चालविण्याची इत्यादी गोष्टी करण्याची पात्रता. परंतु या गुणविशेषांच्या मोजमापनाकडून, जणू काही जादू केल्या-प्रमाणे, तुम्ही स्वतःचे मूल्यमापन करण्यासाठी उड्डाण करण्याची आवश्य-कता नाही. तुमच्या व्यक्तिमत्त्वाचे व बुद्धी व इतर गुणविशेष मोजून तुम्ही वाटल्यास अशा गुणविशेषांचे प्रमाणपत्रक तयार करू शकता. परंतु तुम्ही "स्वतः"ला असे प्रमाणपत्रक न दिलेले बरे. मग स्वतःचे मूल्य-मापन न करता, आत्मश्रेष्ठत्व सिद्ध करण्याचे खेळ न खेळता, किंवा स्वतःची 'लायकी सिद्ध करण्यासाठी इतरांशी स्पर्धा वा संघर्ष न करता तुम्ही स्वतःला विचारू शकता "मला खरोखर आयुष्यात काय हवे आहे ?" आणि अशा तुम्हाला हव्या असलेल्या गोष्टी मिळविण्याचा व उपभोगण्याचा तुम्ही प्रयत्न करू शकाल.

रोग्यांना स्वतःचे मूल्यमापन न करता फार तर फक्त स्वतःच्या गुण-विशेषांचे मोजमापन करण्यास शिकवणे व तेवढ्याच मर्यादित प्रमाणात मूल्यमापन करण्याचा उद्योग हाती घेण्यास शिकवणे ही गोष्ट कोणत्याच मानसोपचारतज्ज्ञाला सोपी जाणार नाही. दुर्दैवाने, माणसे जवळ जवळ सार्वत्रिकपणे स्वतःचे मूल्यमापन अजमावण्यासाठी जन्मलेली व जोपासलेली असतात असे वाटते. उदाहरणार्थ, अमेरिकेत माणसे त्यांच्याजवळ खूप संपत्ती असेल, शिक्षण असेल किंवा त्यांच्याजवळ कलात्मक गुण असतील तर स्वतःला 'लायक' समजतात. या उलट जगाच्या कितीतरी मागासलेल्या भागात माणसे त्यांच्याजवळ बऱ्याच प्रमाणात शारीरिक बळ असेल, प्रजोत्पादनाचे सामर्थ्य असेल किंवा त्यांच्या जवळ युद्धोत्सुक वृत्ती असेल तर स्वतःला 'लायक' मानतात. पण माणसे कोठेही असोत, ती इतरेजनांच्या अपेक्षेकडे लक्ष न देता, स्वतःजवळ जे काही गुणविशेष असतील त्यांच्यासकट स्वतःचा स्वीकार करून स्वतःला जो काय आनंद हवा असेल तो उपभोगण्यास राजी नसतात.

माणसांची स्वतःचे मूल्यमापन करण्याची ही प्रवृत्ती थोडीफार जन्मजात नाही का ? मला वाटते आहे. कारण एकतर जगभर कोठेही जन्मलेली व कशीही वाढलेली माणसे स्वतःला देवपदाकडे नेण्यास व दुसऱ्याला क्षुद्र लेखण्यास

किंवा दुसऱ्याला देवपदाकडे नेण्यास व स्वत:ला क्षुद्र लेखण्यास प्रवृत्त झालेली दिसतात. शिवाय दुसरे असे की ज्या कोणत्या क्षेत्रात त्यांनी यशस्वी झाले पाहिजे असे त्यांची संस्कृती त्यांना सांगते त्या क्षेत्रात यशस्वी न झाल्यास ती माणसे स्वत:ला विमनस्क करून घेतात. म्हणून माणसे सहजपणे व नैसर्गिकपणे स्वत:च्या मूल्यमापनाच्या व अखेर आत्मनिंदेच्या चाकोरीत अडकतात अशी शंका येणे रास्त वाटते. असे वारंवार म्हटले जाते की जग प्रेमावर चालते. सत्य गोष्ट आहे. पण प्रेम म्हणजे प्राय: आत्मप्रेम; किंवा असे आत्मप्रेम संपादन करण्याच्या बहुसंख्य माणसांच्या वेड्यापिश्या स्पर्धेवर जग चालते!

मनुष्याला निरीक्षण करण्याची व तर्कबुद्धीची अद्वितीय देणगी लाभलेली आहे. आणि म्हणून परिणामी तो असा एकटाच प्राणी आहे की जो शास्त्रज्ञ होण्यास जन्माला आला आहे. पण त्याचप्रमाणे त्याला जंतरमंतर विचारसरणीची, श्रद्धाळूपणाची, तर्कदुष्टतेची अप्रात्यायिक विचारसरणीचीही देणगी मिळालेली आहे. Rollo May म्हणतात की माणूस अंगभूतपणे भूतग्रस्त, असुरी वृत्तीकडे झुकलेला आहे. परंतु Rollo May यांनी माणसाच्या या प्रवृत्तीपुढे हात टेकले आहेत असे वाटते; व म्हणून ते म्हणतात की माणसाने त्याच्या या असुरी वृत्तीशी व स्वत:त खोलवर रुतलेल्या तर्कदुष्टतेशी सामोपचाराने वागावे हेच बरे. मी मात्र यापेक्षा बराच जास्त आशावादी दृष्टिकोण स्वीकारतो. मी असे प्रतिपादतो की जरी माणूस क्वचितच तर्कशुद्धपणे विचार करतो तरी त्याला अधिक तर्कशुद्धपणे विचार करणे शक्य आहे. तो जंतर-मंतर व धर्मभोळेपणा झुगारून देण्यास समर्थ आहे. तो केवळ बाह्य जगालाच नव्हे तर स्वत:च्या जीवनातील समस्यांनाही तर्कशुद्ध व प्रात्यायिक विचारसरणीची कास धरून सामोरे जाण्यास शिकू शकतो व खूपशा सुसंगतपणे त्या कार्याला चिकटून राहू शकतो. शिवाय, हे कार्य जर तो खरोखरच दीर्घ काल करील तर तो स्वत:ची लायकी सिद्ध करण्यासाठी खेळत असलेले हास्यास्पद खेळ व स्वत:चे मूल्यमापन करणे बंद करील. तो स्वत:चा व इतरांचा सहिष्णुतेने स्वीकार करील व जिवंत असण्याचा आनंद उपभोगावा, हे जास्त शहाणपणाचे ध्येय स्वत:समोर ठेवील.

अतएव मी माझ्या रोग्यांना फिरून फिरून सल्ला देतो : “ठीक आहे तुमच्या जीवनातील बऱ्याच बाबतीत तुम्ही ब्रह्मघोटाळे केले आहेत हे कबूल. तुमच्या कामात जेवढी कार्यक्षमता दाखविता येणे शक्य होते तेवढी दाखविण्यात तुम्ही अपयशी झाला आहात. तुम्ही चुकीच्या मुलीशी विवाह

केलात; आणि नंतर आल्या आपत्तीतूनही जेवढे शक्य होईल तेवढे सुख पदरात पाडून घेणे अथवा त्या बिकट परिस्थितीतून शक्य तेवढ्या लवकर खुबीने बाहेर पडणे तुम्ही टाळत आला आहात. तुमच्या मुलांचा पिता म्हणून तुम्हाला शक्य होते त्यापेक्षा किती तरी निकृष्टपणे तुम्ही वागलात व परिणामत: त्या मुलांना किती तरी अनावश्यक क्लेश देण्यास कारणीभूत झालात. ठीक आहे. ही सर्व दुष्कृत्ये तुम्ही केली आहेत आणि तुमच्या कृत्यांना माफी करण्यात किंवा त्यांच्याबद्दल सबबी सांगण्यात काही अर्थ नाही. ती कृत्ये बरोबर नव्हती. ती मूर्खपणाची व चुकीची होती. आता या घटकेला तुम्ही स्वत:ला का दोष लावीत आहात? अशा निंद्य प्रकारे वागल्याबद्दल स्वत:चे मूल्य का नाकारत आहात?"

"का बरे? मी तशी कृत्ये करून स्वत:ला व इतरांना दुखवावयास हवेच होते काय?"

"अर्थात तुम्ही तसे करणे क्रमप्राप्त होते; कारण तुम्ही प्रत्यक्ष तसे केलेत. तुम्ही ज्याप्रकारे वागलात तशाप्रकारे न वागणे इष्ट झाले असते. परंतु एखादी गोष्ट इष्ट आहे ह्याचा अर्थ ती तशी असलीच पाहिजे असा नव्हे. जे करणे इष्ट आहे ते तुम्ही केलेच पाहिजे असे फक्त विश्वाचा कोणता तरी अपरिवर्तनीय दैवी नियमच म्हणू शकेल. आणि असा नियम आहे कोठे? अशा काही प्रकारचा नियम कधीकाळी अस्तित्वात होता अथवा अस्तित्वात येईल हे तुम्ही दाखवून देऊ शकता काय?"

"नाही. तुम्ही काय म्हणता ते मला कळले आणि मी जे काही केले ते करावयासच नको होते असे सांगणारा अटळ, अबाधित नियम नसेल तर मला वाटते त्या नियमाचा भंग केल्याबद्दल मला शिक्षा झालीच पाहिजे असे सांगणारा पूरक नियमही नसणार असे तुम्ही म्हणणार ना?"

"बरोबर आहे. अर्थात तुमच्या कित्येक अयोग्य कृत्यांबद्दल तुम्हाला अंगभूत शासन होते. तुमच्या कामात जेवढी कार्यक्षमता दाखविणे शक्य आहे तेवढी कार्यक्षमता दाखविणे तुम्हाला जमले नाही तर कार्यक्षमतेमुळे मिळणाऱ्या मोबदल्याला तुम्ही मुकाल. तुम्हाला अनुरूप नाही अशा पत्नीबरोबर तुम्ही राहिलात व तिच्याबरोबर राहणे जेवढे कठीण आहे त्यापेक्षाही तुम्ही ते अधिक कठीण करून ठेवलेत तर तुम्ही दु:खी कष्टी वैवाहिक जीवन जगाल. म्हणजे अयोग्य वर्तणुकीला किंवा अकार्यक्षमतेला बहुधा (पण नेहमीच नाही) काही स्वाभाविक, अंगभूत शासन मिळते. पण

जेव्हा तुम्हाला वाटते की तुम्ही क्षुद्र माणूस आहात, आणि तुम्हाला शिक्षा झालीच पाहिजे तेव्हा तुम्हाला खरोखरच असे वाटत असते की विश्वातील कोणता तरी सैतानी मुकादम तुमच्यावर टेहेळणी करीत आहे, तुमच्या प्रमादांची नोंद करीत आहे, व त्याबद्दल तुम्हाला शिक्षा करण्याचा निश्चय करीत आहे. तुमच्या मूर्ख वर्तणुकीमुळे अंगभूतपणे अगोदरच तुम्हाला गंभीर शिक्षा होत असताना तुमच्या शिक्षेच्या मापात छळवादीपणे आणखी भर घालण्यासाठी टपलेला व तुमच्यावर नजर ठेवणारा कोणी सैतान अस्तित्वात असणे शक्य वाटते काय ? "

" नाही. तसे मला वाटत नाही. परंतु मी जेव्हा समजतो की वाईट रीतीने वागल्यास मी शिक्षेला पात्र होईन तेव्हा मी कसल्यातरी सैतानावर विश्वास ठेवत असतो असे वाटते खरे. "

" तुम्ही खासच तसा विश्वास ठेवत असता. आणि परलोकाबाबतच्या गोष्टींबद्दल कसे काय ? तुमची खरोखरच श्रद्धा आहे काय की जर या जगात तुम्ही प्रमादशील, अयोग्य व बेताल आयुष्य जगलात तर तुम्हाला कोठे तरी पुन्हा अवतार घ्यावा लागेल व या जगातील दुष्कृत्याबद्दल दुःख भोगणे भाग पडेल ? "

" नाही. असा विश्वास ठेवणे कठीण आहे. पण माझी वर्तणूक मात्र असे सूचित करते की मनाच्या कोणत्यातरी सुप्त कप्प्यात अशा तऱ्हेच्या मूर्खपणावर माझा विश्वास आहे. कारण मी या मर्त्य जगात जेव्हा 'योग्य' गोष्टी करीत नाही तेव्हा मी अनंत काळपर्यंत नरकात टाकला जाणार आहे अशी भावना मला वरचेवर वाटते खरी. "

" बरोबर आहे. तेव्हा तुम्ही स्वतःला वेगवेगळ्या प्रकारे शिव्याशाप जरूर देत असता. आणि तुम्हाला वाटते की तुम्हाला तात्पुरती किंवा अनंतकाळ पर्यंत शिक्षा झाली पाहिजे, मुख्य मुद्दा असा : तुमच्या कृतीचे जरी बरे वाईट-पण ठरविणे जरूर शक्य असले तरी मनुष्य म्हणून तुमचे तसे मूल्यमापन करता येत नाही. ज्या ज्या वेळी तुम्हाला तुम्ही स्वतः क्षुद्र किडा असल्यासारखे वाटते तेव्हा तुम्ही स्वतःचे अवमूल्यन करीत असता, प्रथम ही गोष्ट पूर्णपणे मान्य करीत चला. आणि या मूल्यमापनाचे जोरदारपणे खंडन करीत जा. अशा प्रकारे तुम्ही तुमचे व्यावहारिक प्रश्न सोडवालच असे नाही. उदाहरणार्थ, काम जास्त चांगल्याप्रकारे करणे. पत्नीबरोबर जास्त सलोख्याने वागणे, किंवा तुमच्या मुलांशी पिता म्हणून जास्त चांगल्याप्रकारे वागणे वगैरे. परंतु तुम्ही तुमचे भाव-

नात्मक प्रश्न जरूर सोडवाल. म्हणजे तुम्ही सातत्याने व बिनशर्तपणे स्वतःचा स्वीकार कराल. जरी तुम्हाला स्वतःची बरीचशी वर्तणूक आवडणार नाही, व तशी वर्तणूक तुम्हाला स्वीकारार्ह वाटणार नाही, तरी तुम्ही स्वतः बिनशर्तपणे स्वीकार कराल. म्हणजे तुम्ही तुमच्या स्वतःच्या गुणविशेषांचे मूल्यमापन कराल पण स्वतःचे मूल्यमापन करण्याचे बंद कराल."

"खरोखर माणसे सुसंगतपणे या तत्त्वानुसार वर्तन करू शकतील काय ;"

"अगदी संपूर्णपणे अथवा निरपवादपणे नाही. परंतु जर लोक प्रयत्न करीत राहतील तर ते खूपच प्रमाणात यशस्वी होतील; आणि बाकी इतर बाबतीत ते मानव राहतील तरी त्यांना क्वचितच अहंकाराचा प्रश्न भेडसावेल. वस्तुतः तुम्हाला अहंकाराची समस्या आहे याचा खरा अर्थ म्हणजे तुम्ही अतिमानुष किंवा ईश्वरी अवतार होण्याच्या धडपडीत आहात; आणि तुम्ही मुळी तुमचे मानवीपण, प्रमादशीलता पूर्णपणे मान्य करणार नाही. माणसाच्या वैयक्तिक समस्या सोडविण्याच्या ज्या काही मानवतावादी पद्धती शोधून काढलेल्या आहेत त्यापैकी सर्वांत जास्त मानवतावादी असलेल्या विवेकनिष्ठ मानसोपचार पद्धतीची तुम्ही कास धराल तर तुम्ही बिनशर्तपणे स्वतःचा व इतरांचा मनुष्य म्हणून स्वीकार कराल. (या पद्धतीचे संक्षिप्त विवेचन अनुवादकाच्या "विवेकनिष्ठ मानसोपचारशास्त्र– एक जीवन–तत्त्वज्ञान" या लेखात वाचावयास मिळेल. पहा : नवभारत. जून १९७१) माझे असे मत आहे की या प्रकारची सहिष्णुता ही भावनात्मक समाधानाचे सारसर्वस्व आहे; स्वतःपुरता या गुरुकिल्लीचा उपयोग करून का पाहात नाही ?"

मानसोपचारपद्धतीचा हा विवेकनिष्ठ मार्ग केवळ रोग्यांच्याच बाबतीत असामान्यपणे परिणामकारक आहे असे नाही; तर त्याला आता विपुल प्रमाणात प्रायोगिक पुरावा सातत्याने पाठिंबा देत आहे आणि असे दर्शवून देत आहे की मानवी भावना व वर्तन यावर माणसाच्या विचारांचा प्रचंड प्रभाव पडत असतो. या पद्धतीचा कितीतरी मानसोपचारतज्ज्ञ त्यांच्या व्यावसायिक कामात परिणामकारक रीतीने उपयोग करीत आहेत. इतकेच नव्हे तर या पद्धतीच्या तत्त्वांचा उपयोग शिक्षण, उद्योगधंदे आणि इतर क्षेत्रातही करता येतो. विवेकनिष्ठ मानसोपचार पद्धतीला प्रायोगिक व इतरही तऱ्हेचा खूप आधार आहे.

कोणतीही मानसोपचारपद्धती ही मूलतः एक मूल्यप्रणाली असते. जो मनुष्य प्रक्षुब्ध असतो तो ठरवितो की त्याने जरा कमी काळजीग्रस्त, विमनस्क,

अकार्यक्षम किंवा वैरग्रस्त असणे अधिक चांगले; आणि त्याला असे वाटते की मानसोपचारतज्ज्ञाशी बोलून आपल्याला फायदा होईल. मानसोपचार-तज्ज्ञाच्या बाबतीत म्हणाल तर रोग्याप्रमाणे त्याचेही असे मत असते की रोग्याने इतके अशांत अथवा प्रक्षुब्ध असणे अनावश्यक आहे आणि तो रोग्याला काही ना काही मार्गाने बरे वाटण्यास व वागण्यास मदत करू शकेल. तत्त्वत: मानसोपचारशास्त्रज्ञ व रोगी दोघेही असे मान्य करू शकतात की भयंकर चिंता, विमनस्कता व वैरभाव हितकारक आहेत आणि असे असेल तर मान-सोपचारतज्ज्ञ सामाजिक शास्त्रज्ञ म्हणून रोग्याला कमी अशांत होण्याऐवजी जास्त अशांत होण्यास मदत करू शकेल. परंतु ज्याला आपण सामान्यत: भावनिक समस्या म्हणतो त्याबद्दल दोघांच्याही मनात सारख्याच कल्पना किंवा पूर्वग्रह असतात; आणि जेव्हा रोग्याला वाटते की तो अशा समस्यामुळे कमालीचा गांजला आहे तेव्हा ते दोघेही अशा समस्या जास्ती न वाढविता कमी करण्यासाठी सहकार्य करण्यास तयार होतात.

रोग्यावर मानसोपचार करीत असता असे आढळून आले आहे की बहुतेकदा जेव्हा रोगी चिंताग्रस्त, जीवन-विन्मुख, उदास व विमनस्क असतो तेव्हा तो स्वत:चे मूल्यमापन अतिशय निकृष्ट पातळीवर करीत असतो आणि स्वत:ला क्षुद्र, असमर्थ किंवा नालायक मानीत असतो. जोपर्यंत त्याच्यासमोर स्वत:चे असे हे चित्र आहे तोपर्यंत त्याला थोडा विरंगुळा मिळावा म्हणून त्याचे चित्त निरनिराळ्या मार्गांनी अन्यत्र गुंतविणे शक्य असले तरी त्याच्या मूळ समस्येवर उपाय करणे जवळ जवळ अशक्य वाटते. म्हणून सखोल मूलग्राही मानसोपचारपद्धतीचे मुख्य लक्ष्य बहुधा रोग्याला स्वत:ची निर्भर्त्सना करण्या-पासून परावृत्त करण्यास मदत करणे आणि ज्याला सामान्यत: आत्मविश्वास, स्वाभिमान किंवा आत्मबळ म्हणतात ते मिळविण्यास मदत करणे हे असते.

विवेकनिष्ठ मानसोपचारशास्त्र असे मानते की रोग्याला स्वत:चा स्वीकार करण्यास मदत करण्याचे दोन प्रमुख मार्ग आहेत. एक मार्ग आहे सुंदर किंवा उत्कृष्ट मार्ग; व दुसरा मार्ग आहे असुंदर किंवा निकृष्ट मार्ग. निकृष्ट मार्ग म्हणजे त्याला असा विश्वास ठेवण्यास शिकवणे की तो मनुष्य म्हणून लायक व मूल्यवान आहे कारण तो काही गोष्टी चांगल्याप्रकारे करतो, किंवा लोक त्याला मानतात म्हणून नाही, तर केवळ तो अस्तित्वात आहे, जिवंत आहे म्हणून. यापेक्षा जास्त समंजस मार्ग म्हणजे त्याला पटवून देणे की स्वत:चे मूल्यमापन करण्याची श्रेष्ठता-कनिष्ठता ठरविण्याची मुळी आवश्यकताच नाही; तो फक्त

मान्य करू शकतो की तो अस्तित्वात आहे; त्याने जिवंत राहणे व आनंदी राहणे हे दुःखात राहण्यापेक्षा व मरणापेक्षा बरे; विनाकारण स्वतःच्या तथाकथित स्वत्वाचे मूल्यमापन करण्याचा नसता उपद्व्याप करण्यापेक्षा केवळ स्वतःचे गुण-विशेष व कार्य यांचे मोजमापन व मूल्यमापन केले तर तो जीवनात जास्त आनंद मिळवू शकेल. एकदा रोग्याला स्वतःसकट सर्व माणसांशी सहिष्णुतेने वागण्यास मदत केली व त्यांना सर्वसमावेशक प्रमाणपत्रे देण्याचे बंद केले की त्याच्या वैयक्तिक मूल्याच्या तात्त्विक प्रश्नाला उत्तर मिळते. आणि मग तो स्वतःचे मूल्यमापन न करता, स्वतःचा खऱ्या अर्थाने स्वीकार करतो. मग तो स्वतःला चांगला अथवा वाईटही मानणार नाही; तो स्वतःला सुदैवी अथवा दुर्दैवी गुणविशेष असलेला मनुष्य समजेल. तो प्रामाणिकपणे स्वतःचे मनुष्यत्व मान्य करील व कोणाकडूनही अतिमानुषतेची किंवा परिपूर्णतेची मागणी करणार नाही.



डॉ. कु. उषा करंबेळकर

# पुराणातील सुपरिचित पण गूढ व्यक्ति

## २ : " अहल्या "

### प्रास्ताविक

दररोज सकाळी घरोघरी वयोवृद्ध स्त्रिया प्रातःस्मरण करतात. त्या प्रातःस्मरणात पंचकन्यांचे नामस्मरण अन्तर्भूत आहे.

अहल्या-द्रौपदी-सीता-तारा-मन्दोदरी तथा ।
पञ्चकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥

–ह्या नामस्मरणात 'अहल्या' हे नाव सर्वप्रथम आलेले आहे. वाल्मीकि रामायणात आलेल्या अहल्योद्धाराच्या कथेमुळे अहल्या ही सर्व लहानथोर व्यक्तींना परिचित अशी पौराणिक व्यक्तिरेखा आहे. अहल्या हे नाव व तिच्यासंबंधीची परंपरेने प्राप्त झालेली कथा जरी अगदी सुपरिचित असली तरी 'अहल्ये'चे स्वरूप मात्र तितकेच गूढ आहे. त्यामुळे पौराणिक व्यक्तिरेखात तिच्याविषयीचा विचार आवश्यक ठरतो.

### अहल्येची कथा

अहल्येसंबंधीची कथा अगदी प्रथम आपल्याला वाल्मीकीच्या रामायणातच पहावयास मिळते. या कथेचा विशेष असा की वाल्मीकि रामायणातच (वा.रा.) ही कथा दोनदा आलेली आहे. इतकेच नव्हे तर दोन्ही ठिकाणच्या कथाभागात एकवाक्यता नाही. वा. रा. बालकांड अ. ४८ मध्ये ही कथा पुढीलप्रमाणे आलेली आहे:– गौतम ऋषि आपल्या अहल्यानामक पत्नीसह अनेक वर्षे आपल्या आश्रमात राहत असे. एकदा ऋषि आश्रमात नाही हे पाहून व त्याचे स्वरूप धारण करून इंद्र आश्रमात आला. त्याने अहल्येजवळ तिच्याशी संगम करण्याची आपली इच्छा व्यक्त केली. गौतमाचे रूप धारण करून आलेल्या इंद्राला तिने ओळखले. त्या देवराजाविषयीच्या कुतूहलाने तिने त्याला होकार दिला. नंतर सुरश्रेष्ठाला "येथून लवकर जा व स्वतःचे आणि माझे गौतमापासून रक्षण

अनुक्रमणिका






कर" असे विनविले. आश्रमातून बाहेर पडणाऱ्या त्या इंद्राने आश्रमात प्रवेश करणाऱ्या महामुनि गौतमाला पाहिले. हातात दर्भ-समिधा व कमंडलु असलेल्या तेजस्वी मुनि गौतमाला पाहून इंद्र अतिशय घाबरला. मुनीने इंद्राला ओळखले. झालेला प्रकार त्याच्या ध्यानात येण्यास वेळ लागला नाही. त्यामुळे क्रुद्ध झालेल्या त्याने इंद्राला—

'विफलस्त्वं भविष्यसि' । वा. रा. बा. ४८, २८

— असा शाप दिला.

घडलेल्या कृत्यात आपली धर्मपत्नी अहल्या तितकीच दोषाला पात्र आहे हे जाणून त्या मुनीने तिलाही पुढीलप्रकारे शापिले।

इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि ॥
वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी ।
अदृश्या सर्वभूतानामाश्रमेऽस्मिन् वसिष्यसि ॥ वा. रा. बा. ४८. ३०,३१

अहल्येला शाप दिल्यानंतर स्वतः मुनि त्या स्थानाचा त्याग करून हिमालयाच्या शिखरावर तपश्चर्या करण्यास निघून गेला. शापित इन्द्रदेखील देवांच्याकडे जाऊन "मया सुरकार्यमिदं कृतम् ।" असे म्हणून आपण केलेल्या कृत्याचे समर्थनच करीत होता.' अशी ही कथा बालकाण्डात आली आहे.

पुढे वा० रा० उत्तरकाण्ड अ. ३० मध्ये थोडया फरकाने हा कथाभाग येतो. त्यात ब्रह्मदेवाने इन्द्राला सांगितले, 'सर्व प्रजा उत्पन्न केल्यानंतर मी एक अत्यंत सुंदर स्त्री निर्मिली. तिच्याठिकाणी कुरूपता नसल्यामुळे तिचे नाव अहल्या (रूपवती) असे ठेवले. ती कोणाला द्यावी असा प्रश्न ब्रह्मदेवापुढे होता. तिच्या सौंदर्यामुळे इन्द्रदेखील तिच्याकडे आकृष्ट झाला होता. ब्रह्मदेवाने तिला गौतमाकडे ठेव म्हणून ठेवले. वयात येताच ऋषीने ती त्याच्याकडे परत पाठविली. संयमी गौतमच हिला योग्य पति होईल असे ठरवून ब्रह्मदेवाने ती पत्नी म्हणून गौतमाला अर्पण केली. इतर देव निराश झाले. इन्द्र मात्र क्रुद्ध व कामातुर झाला; व त्याने अहल्येशी वाईट व्यवहार केला. त्यामुळे गौतमाने त्याला शाप दिला. तसेच अहल्येला 'तू रूपहीन होऊन रहा' असा शाप दिला. इन्द्राने कपटवेषाने येऊन आपल्याला फसविले; मी जाणून हे पाप केलेले नाही म्हणून आपणास क्षमा असावी' असे तिने गौतमाला विनविले. तेव्हा 'रामाच्या पदस्पर्शाने पूर्वरूपाला प्राप्त होशील' असा दयार्द्र गौतमाने उःशाप दिला. येथून मूळ कथेतील स्वाभाविकपणा हळुहळू कमी होऊ लागला. पुढे पुराणांनी तर

अनुक्रमणिका

नित्याच्या सवयीप्रमाणे कथेत हवा तसा बदल करून मुळातील कथेला पूर्णपणे अद्‌भुत करून टाकली.

पुराणांनी केलेला विस्तार–

ब्रह्मपुराणाने ( ८७ ) या अहल्याकथेत बरेच बदल करून तिला वेगळेच स्वरूप दिले. ब्रह्मदेवाने ही चारुसर्वाङ्गी शुभलक्षणा कन्या गौतमाकडे पोषणासाठी ठेवली. वयात येताच तिला ब्रह्मदेवाकडे गौतमाने परत पाठवावे असे ठरले होते; ठरल्याप्रमाणे गौतमाने निर्विकार चित्ताने योग्य वेळी ठेव ब्रह्मदेवाकडे परत केली; तिच्या अलौकिक सौंदर्याने देव–दानवादि तिच्याविषयी अभिलाषा करू लागले; पण ब्रह्मदेवाने तिची प्राप्ति पृथ्वीप्रदक्षिणा करून प्रथम परत येणाऱ्यास होईल असा पण केला. सगळे पृथ्वीप्रदक्षिणा करण्यास सरसावले. गौतमाने ही अर्धप्रसूत धेनु म्हणजेच पृथ्वी असल्यामुळे तिला प्रदक्षिणा करून सर्वप्रथम ब्रह्मदेवाजवळ प्राप्त होऊन अहल्या मिळविली. पहिल्यापासूनच गौतमाच्या गाम्भीर्य, धैर्य, निर्विकारता, माहात्म्य आदि गुणांवर संतुष्ट असलेल्या ब्रह्मदेवाने दोघांचा मोठ्या आनंदाने विवाह लावून दिला. विवाहानंतर दोघे ब्रह्मगिरीवर राहावयास गेले. पृथ्वीप्रदक्षिणा करून एकामागून एक परत आलेले देव–दानवादि निराश होऊन गेले. पण देवांचा राजा झालेल्या घटनेने अपमान झाल्याचे समजून मनातल्या मनात धुमसत राहिला. तो पापबुद्धीने ब्रह्मगिरीवर येऊन राहिला. गौतम शिष्यासह आश्रमाबाहेर गेल्याची संधी साधून गौतमरूपाने तो आश्रमातील अहल्येकडे गेला. सलगीने तिच्याशी वागला. संशय न आल्यामुळे ती त्याला पति समजून वागली. इन्द्र वारंवार तिच्या भेटीस येऊ लागला. आश्रमातील इतरास ऋषीचे आचरण आश्चर्यकारक वाटे. एकदा गौतमरूपातील इन्द्र–अहल्या आश्रमात व मुनि गौतम आश्रमाच्या द्वाराशी पाहून तर शिष्य व इतर लोक आश्चर्यचकित झाले. त्यांना तो गौतमाच्या तपस्येचा प्रभाव वाटला. तसे काहींनी ऋषीजवळ बोलताच त्याच्या मनात संशय आला. त्याने दरडावून कपटवेषधारी गौतमास विचारले. त्याने इन्द्र असल्याचे कबूल केले. गौतमाने इन्द्राला, 'भगावर' आसक्त होऊन पापाचरण केलेस त्यामुळे तुझ्या अंगावर हजारो भग होवोत' असा शाप दिला. व अहल्येस 'शुष्क नदी हो.' असा शाप दिला. कथेत अशा रीतीने अवास्तवतेचा विस्तार झाला.

पद्म पुराणाने (सृ. ५९) ब्रह्म पुराणातील बराच भाग तसाच ठेवून थोडा बदल केला. गौतमरूपधारी इन्द्राने येऊन अहल्येशी आश्रमात केलेला व्यवहार

पुष्करतीर्थावर ध्यानमग्न होऊ इच्छिणाऱ्या गौतमाने जाणला व तडक आश्रमात येऊन इन्द्राला शाप दिला. शाप ब्रह्म पुराणातीलच घेतला आहे. फक्त 'पापिष्ट लिङ्गं ते निपतिष्यति ।' अशी थोडी भर घातली. अहल्येला तिच्या पतीने 'तुझ्यात कुठलीच वाढ होणार नाही' असा शाप दिला.

गणेश पुराणाने ( १.३०,३१ ) ब्रह्म पुराणाची पद्धत घेतलेली नाही. नारदाने इन्द्राला अहल्येसंबंधाने माहिती दिली व त्यामुळे इन्द्र कामातुर झाला –असे म्हटले आहे. इन्द्र जरी पतिरूपाने आला होता तरी त्याच्या सहवासानंतर तिच्या मनात त्याच्याबद्दल संशय उत्पन्न झाला. तिने रागाने 'तू कोण आहेस ?' असा प्रश्न करताच इन्द्राने आपण देवराज असल्याचे व तुझ्या सौंदर्याच्या मोहाने आल्याचे सांगून टाकले. तेवढ्यात नदीवरून परत आलेल्या पतीपुढे ती जाऊ शकली नाही. ह्या पुराणात इन्द्राचा तोच 'सहस्रभगवान भव ।' असा शाप दिला आहे. आपल्या पत्नीला स्वतःच्या पतीचे स्वरूप देखील जाणता आले नाही व तिने पापाचरण केले म्हणून गौतमाने तिला 'त्वं शिला भव ।' असा शाप दिला आहे : ; जो वरील शापाहून वेगळा आहे.

स्कन्द पुराणाने बाकी कथाभागात बदल केला नाही. फक्त गौतम आपल्या पत्नीकरता तप करण्यास प्रवृत्त झाला असे म्हटले आहे.

अशा प्रकारे वा. रा. आणि पुराणे यांनी अहल्येसंबंधीच्या कथावृक्षाच्या शाखा कशा पल्लवित केल्या हे आपण पाहिले. पण अद्यापि आपल्याला मुख्य गोष्ट जाणून घ्यावयाची राहिली आहे. ती म्हणजे ह्या कथावृक्षाचे बीज. मुळात ह्या कथेला काय आधार आहे ? हिच्यात ऐतिहासिक दृष्ट्या काही सत्यांश आढळतो काय ? ह्या दोहोंचा आता आपण शोध घेऊ.

## ऐतिहासिक तथ्य

अहल्या हे नाव इतिहासात आढळते. त्रेतायुगात गंगेच्या उत्तरेला पञ्चालांचे राज्य होते. त्यातील भृंयश्व राजाचा सर्वात मोठा मुलगा मुद्गल. भार्म्यश्व मुद्गलाचे नाव ऋग्वेदात येते. ( ऋ. १०.१०२ ५,९ ) या मुद्गलाचा मुलगा ब्रध्निष्ठ व त्याची राणी इन्द्रसेना. यांचा मुलगा वध्र्यश्व ( ऋ. १०.६९. १;६.६१.१) याच्या राणीचे नाव मेनका. वध्र्यश्वाचा मुलगा दिवोदास अतिथिग्व व त्याची जुळी बहीण अहल्या; हिचा विवाह शरद्वन्त आंगिरसाशी झालेला होता. यालाच गौतम म्हणत असावेत. यांना शतानंद नावाचा मुलगा झाला. हा मिथिलेच्या जनकाचा पुरोहित होता. ह्या ऐतिहासिक

अहल्येचा कुणा इंद्राशी संबंध आला व त्यामुळे रागावलेल्या तिच्या पतीने तिला शाप दिला– ह्याला इतिहासात तरी काही आधार मिळत नाही[१].

ह्याच सुमारास अयोध्येला इक्ष्वाकु वंशाचे दिलीप खट्वाङ्ग, रघु, अज, दशरथ, राम, हे राजे झाले. अगदी समकालीनत्वच पहावयाचे झाल्यास दिवोदास ( अहल्येचा भाऊ ) हा अजाचा समकालीन होता– असे दिसते. त्यानंतर दशरथ व नंतर बऱ्याच वर्षांनी जन्माला आलेला राम. ( वृद्धापकाळी दशरथाला पुत्रप्राप्ती झाली हे सर्वविदित आहेच ). रामाचा उल्लेख अहल्येच्या कथेत येतो. तिला झालेला शाप व त्यातून रामाच्या दर्शनाने वा पदस्पर्शाने शापातून तिची झालेली मुक्तता या दोन घटनात ५० वर्षांच्या वर कालावधि लोटलेला असणार !

वाल्मीकीने अहल्येची कथा रामाशी जोडत असताना ऐतिहासिक सत्य अगदीच डोळ्याआड केलेले नव्हते. रामाच्या पदस्पर्शाने व्यथित शापमुक्त व पापमुक्त होते असा आपल्या कथा-नायकाचा महिमा कवि सांगत आहे त्यासाठी त्याने ही अहल्योद्धाराची कथा आपल्या ग्रंथात आणली. पण ग्रंथकाराला कुठलीही गोष्ट आपल्या ग्रंथात अंतर्भूत करीत असताना तिला वेद-ब्राह्मणादि प्राचीन ग्रंथात आधार आहे हे दाखवावे लागते. तसा काही आधार– एखादा धागा वाल्मीकीला सापडला होता काय हे बघणे क्रमप्राप्त आहे.

### कथेचा मूळ आधार–

वाल्मीकीने इंद्र-अहल्या यांच्यासंबंधाने वर्णिलेल्या कथेला वेदात काय आधार आहे हे पाहू गेल्यास निराशाच पदरी येते. कारण वेदांच्या संहितात अहल्येचा नुसता नामनिर्देश देखील मिळत नाही. संहितांचा जो भाग कालाच्या उदरात गडप झाला त्यात अहल्येचा निर्देश असणे शक्य आहे असे म्हणून मनाचे समाधान करावे लागते. पुढे ब्राह्मण ग्रंथातून अहल्येसंबंधाने काय माहिती मिळते हे पाहू –

सर्वप्रथम शतपथ ब्राह्मणात. अहल्येचा निर्देश आलेला आहे; आणि मुख्य सांगावयाचे म्हणजे आलेला अहल्येचा निर्देश इंद्राच्या संबंधात आहे. तो निर्देश असा– सूक्तकर्ता ऋषि इंद्राची स्तुति करीत असताना त्याला उद्देशून जी अनेक संबोधने वापरतो आहे त्यात एक आहे ' अहल्यायै जार '

---

१. योगवासिष्ठांतही एक अहल्येची कथा येते. पण ती अहल्या वेगळी होती.

शतपथ ब्रा. ( ३।३।४।१८ ) तील तो परिच्छेद असा आहे :

"इंद्रो वै यज्ञस्य देवता, तस्मात् आह, 'इंद्र ! आगच्छ' इति। 'हरिव आगच्छ', 'मेधातिथेर्मेष', 'वृषणश्वस्य मेने', 'गौरावस्कन्दिन्, 'अहल्यायै जार' इति। तत् यानि अस्य चरणानि तैरेव एनं एतत् प्रमुमोदयिष्यति।"

वरील परिच्छेदाचा अनुवाद असा–

'इंद्र यज्ञाची देवता आहे. म्हणून म्हणतो, "हे इंद्रा ! ये. हे हरिद्वर्णाचे अश्व असलेल्या ये, हे मेधातिथीच्या मेंढ्या ( ये ); हे वृषणश्वाच्या मेने (ये); हे गौर वर्णाच्या पशुवर बसणाऱ्या ( ये ); हे अहल्येच्या जारा ( ये ), ही या इंद्राची चरित्रे: त्यानीच तो त्याला आनंदवील ( आनंद देईल )." शतपथ ब्रा. तील वरील परिच्छेदात आलेले प्रत्येक संबोधन इन्द्राचे एक एक कृत्य (चरित्र) सांगणारे आहे. त्या इन्द्राच्या प्रशंसार्ह कृत्यांनी यजमान इन्द्राला आनंदित करण्याची इच्छा करतो आहे.

शत. ब्रा. तील ह्या परिच्छेदाचे विवरण आपल्याला षड्विंश ब्रा. (अ. १।१) किंवा ताण्डच ब्रा. (२६।१) मध्ये मिळते.

त्यापैकी 'अहल्यायै जार' यावरील विवरण पुढीलप्रमाणे आहे– "अहल्यायै जार" इति, अहल्याया ह मैत्रेय्या जार आस। कौशिक ब्राह्मणेति; कौशिको ह स्म एनं ब्राह्मण उपन्येति। गोतमब्रुवाणेति, – देवासुरा ह संयत्ता आसंस्तानन्तरेण गोतमो शश्राम तमिन्द्र उपेत्योवाच, इह नो भवां-स्त्स्पशश्चरत्विति, नाहमुत्सह इति, अथाहं भवतो रूपेण चराणीति यथा मन्यस इति, स यत्तद्गोतमो वा ब्रुवाणश्चचार गोतमरूपेण वा तदेतदाह।"

ह्याचा अनुवाद असा– 'अहल्यायै जार' इति– याचा अर्थ– मैत्रेयी अहल्येचा इन्द्र जार होता. 'कौशिक ब्राह्मण' इति– याचा अर्थ– कौशिक ब्राह्मण तिच्याकडे विवाहासाठी गेला. गोतमब्रुवाणेति– याचा अर्थ, मी गौतम आहे असे सांगणारा. त्याचे संबोधन गौतमब्रुवाण हे होय. – एकदा देव व असुर यांचे घनघोर युद्ध झाले. त्या युद्धात गौतम फार थकला. त्याच्याजवळ येऊन इन्द्र त्याला म्हणाला. 'असुर तुला त्रास देतील. तू आमचा गुप्तचर होऊन संचार कर," त्यावर गौतम म्हणतो, "तसे करण्याचा माझ्यात उत्साह नाही." इन्द्र म्हणतो, "आणि मी तुझे रूप धारण करून येथे संचार करतो." त्यावर गौतम उत्तरतो, "जशी तुझी इच्छा असेल तसे कर." तेव्हा 'मी गौतम आहे' असे सांगणारा तो संचार करू लागला; – गौतमाचे रूप घेऊन; लोक ज्याला गौतम म्हणत असा.

अनुक्रमणिका

या षड्विंश ब्रा० तील विवरणात इन्द्र गौतमाच्या अनुमतीने गौतमाचे रूप घेऊन फिरू लागला असा निर्देश आहे. त्यात कुठेच अहल्येचा व इन्द्राने तिचे धर्षण केल्याचा उल्लेख नाही. वैदिक ब्राह्मण ग्रंथात इंद्राला 'अहल्येचा जार' म्हटले आहे. त्याचप्रमाणे इन्द्राने गौतमाचे रूप घेतले असेही म्हटले आहे. ह्या दोन गोष्टी जोडल्या की वाल्मीकीला आपली कथा बनविणे जड नव्हते; व तसेच त्याने केले. परंतु येथे लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की गौतम अहल्येचा पति होता असे ब्रा० ग्रं. त कोठेच म्हटलेले नाही. त्यामुळे इन्द्राने अहल्येचे धर्षण केले ही कविकल्पनाच ठरते. ह्या कल्पनेचा एकमेव आधार म्हणजे 'जार' शब्द हा होय. त्यामुळे 'अहल्यायै जारः' यातील जार शब्दाकडे लक्ष दिले पाहिजे.

जार शब्दाचा अर्थ–

वेदाच्या सध्या उपलब्ध संहितात जवळपास ३० वेळा 'जारं शब्दाचा उपयोग आलेला आहे. जेथे जेथे मंत्रात 'जार' शब्द आलेला आहे तेथे तेथे तो कोणत्या अर्थात आला आहे ते पाहणे योग्य होईल. जार या शब्दात √ जॄ वयोहानौ – जरयतीति जारः (पा. ३।३।२०१४) – पाणिनीने दिलेल्या व्युत्पत्तिवरून 'जीर्ण करणारा' असा जार शब्दाचा अर्थ दिसतो.

आता ठिकठिकाणी वैदिक संहितात आलेला जार शब्द व त्याचा अर्थ पाहू :–

१) ऋ, १।४६।४ हविषा जारो अपां पिपर्ति पपुरिर्नरा ।
पिता कुटस्य चर्षणिः ॥

या ऋचेत 'अपां जारः' वर्णिला आहे. जलांचा जार म्हणजे जलाला क्षीण करणारा– जलाचे शोषण करणारा असा अर्थ आहे.

२) ऋ. १०।१११।१०–

सध्रीचीः सिन्धुमुशतीरिवायन्त्सनाज्जार आरितः पूर्भिदासाम् ।
यात 'शत्रूची शक्ति क्षीण करणारा' या अर्थात जार शब्द आलेला आहे.

३) ऋ. १०।१०६।७–

पज्रेव चर्चरं जारं मरायु क्षद्मेवार्थेषु तर्तरीथ उग्रा ।
येथे आलेला जार शब्द हा 'जीर्ण होणार' याच अर्थाचा आहे.

४) ऋ. १।६९।१–

शुक्रः शुशुक्वाँ उषो न जारः पप्रा समीची दिवो न ज्योतिः ।
येथे 'उषांचा जार' म्हणजे उषांची शक्ति क्षीण करणारा हा अर्थ आहे.

अनुक्रमणिका

√जृ–स्तुतौ असा धातु जार शब्दात घेता येतो. स्तुत्य या अर्थातील जार शब्द वेदात आलेला आहे.

ऋ. १०।४२।२ वा अथर्व २०।८९।२ –

दोहेन गामुप शिक्षा सखायं प्र बोधय जरितर्जारमिन्द्रम् ।

येथे जारं इन्द्रं– स्तुत्य इन्द्राला हे जरितः – स्तुति करणाऱ्या प्रबोधय– जागे कर असे म्हटले आहे. वरील ऋचेत जवळ जवळ आलेले 'जरितः' आणि 'जारः' हे शब्द परस्परांचा अर्थ निश्चित करतात. स्तुति करणे या अर्थाच्या जॄ धातुवरून ते दोन्ही शब्द तयार केलेले आहेत. जरिता शब्द–स्तुति करणारा या अर्थाचा असून जार शब्द–स्तुतीला योग्य, स्तुत्य, प्रशंसार्ह या अर्थाचा आहे. येथे जार शब्द इन्द्राचे विशेषण आहे. 'अहल्यायै जारः' यात इन्द्राला 'जार' म्हटलेले आहे. जार शब्दाचा अर्थ जर स्तुत्य असा असेल तर 'अहल्यायै जार' याचा 'अहल्येसाठी प्रशंसेला योग्य असलेला' असा अर्थ होईल.

वेदात 'जारम्' 'जारिणी' हे शब्द व्यभिचार करणारा पुरुष व स्त्री यांना उद्देशूनही आहेत. उदा० –

ऋ. ७।७६।३

तानीदहानि बहुलान्यासन् या प्राचीनमुदिता सूर्यस्य ।

यतः परि जार इवाचरन्त्युषो ददृक्षे न पुनर्यतीव ॥

ऋ. १०।३४।५

यदादीध्ये न दविषाण्येभिः परायद्भ्योऽव हीये सखिभ्यः ।

न्युप्ताश्च बभ्रवो वाचमक्रतँ एमीदेषां निष्कृतं जारिणीव ॥

पण 'अहल्यायै जार' येथे जार शब्द 'व्यभिचार करणारा' या अर्थाचा नाही हे दाखविण्यासाठी आपल्याला अहल्या शब्द विचारात घ्यावयाचा आहे. तत्पूर्वी इन्द्र आणि गौतम यांचा विचार करू:

## इन्द्र आणि त्याचे सुरकार्य

इन्द्र या शब्दाची व्युत्पत्ति यास्कांनी अनेक प्रकारे केली आहे.

इरां दृणातीति वा इरां ददातीति वा

इरां दधातीति वा इरां दारयत इति वा

इरां धारयत इति वा ...... (निरुक्त १०।८)

या सर्व व्युत्पत्तिमध्ये इन्द्राचा 'इरा' (अन्न) याच्याशी संबंध दिसून येतो. त्यामुळे इन्द्र ही अन्नधान्याशी संबंधित असलेली वैदिक देवता आहे हे स्पष्ट होते. अन्नधान्य उत्पन्न करणारी पर्जन्य देवताच असणार. वेदात आलेल्या इन्द्रवृत्र ह्या कथेचे स्पष्टीकरणही हेच सांगते की इन्द्राने वृत्राचा वध करून पाण्याच्या प्रवाहाला मोकळे केले. (निरुक्त २.१६). इन्द्र ही पर्जन्यदेवता आहे हे पुराणात आलेल्या गोवर्धन कथेवरून अगदी उघड झालेले आहे. पर्जन्याची देवता असलेल्या इन्द्राने अहल्येचे धर्षण केले म्हणजे काय केले? पर्जन्याच्या देवतेने पर्जन्यवृष्टि केली हाच त्याचा अर्थ. वाल्मीकीने देखील इन्द्राकडून झालेले धर्षण हे सुरकार्य असल्याचे त्याच्याच मुखातून वदविले आहे. इन्द्र नामक देवतेने अहल्येचे धर्षण केले असे म्हटल्यामुळे अहल्या–इन्द्र कथा ही रूपकात्मक आहे हे अगदी स्पष्ट झाले. त्यातील इन्द्र म्हणजे पर्जन्य– देवता असून तिने अहल्येचे घर्षण केले म्हणजे दुसरे तिसरे काही नसून त्या देवतेने आपले पर्जन्य-वृष्टीचे कार्य केले जे सुरकार्य होय.

आता ह्या कथेतील उरलेला भाग म्हणजे गौतम आणि अहल्या हा होय. त्यापैकी प्रथम गौतमाचा विचार करू —

## गौतम म्हणजे कोण ?

वर आलेल्या शतपथ आदि ब्रा० ग्रंथातील 'अहल्यायै जार' ह्या इन्द्राच्या स्तुतिवचनात व त्यावरील स्पष्टीकरणात इन्द्राने गौतमाचे रूप घेतले असे म्हटलेले आहे; पण त्यात कोठेच अहल्या ही ह्या गौतमाची पत्नी होती असे म्हटलेले नाही. वैदिक संहितातून मिळणारे ऐतिहासिक सत्य आपण पाहिले आहेच. त्यात अहल्येचा पति कोणी आंगिरस आहे. त्यालाच गौतम वा गोतम म्हणत ह्याला सबळ पुरावा नाही. जर ही अहल्या–कथा रूपकात्मक आहे तर गौतम-गोतम म्हणजे कोण ?

गो शब्दाचा उपयोग वैदिक संहितातून नेहमीच सूर्यकिरणे या अर्थात केला जातो 'सर्वेऽपि रश्मयो गाव उच्यन्ते ॥' निरुक्त २।७

उदाहरण म्हणून एक ऋचा ऋग्वेदातून पुढे देत आहे. ऋ. १–१५४–६,

ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः।
अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पद मवभाति भूरि ॥

–त्यामुळे गो शब्दावरून तमप् प्रत्यय लावून तयार केलेला गोतम-गौतम हा शब्द 'अत्यधिक किरणांचा' = सूर्य हा अर्थ सांगतो. गोतम-गौतम ह्याचा

सूर्य हाच अर्थ दर्शविणारी व्युत्पत्ति महाभारत अनुशासन पर्व अ. ९३ श्लो. ९४ वरील नीलकण्ठीत, तसेच वायु पुराणात पहावयास मिळते. त्यामुळे गौतम म्हणजे सूर्य असे ठरते. यानंतर शेवटी अहल्या म्हणजे काय हे पाहून आपण या रूपकात्मक कथेतील सार शोधून तिचा शेवट गाठू.

अहल्या –

आता अहल्या शब्दाची व्युत्पत्ति आपण पाहू. त्या व्युत्पत्तिसाठी वेदातून आपल्याला कोणत्याच प्रकारे मदत होत नाही. ज्या वाल्मीकी रामायणने ही अहल्याधर्षणाची कथा रंगविली त्या वा० रा. च्या उत्तरकाण्ड अ. ३० मध्ये आपल्याला अहल्या शब्दाची पुढील व्युत्पत्ति मिळते.

" हलं नामेह वैरुप्यं हल्यं तत्प्रभवं भवेत् ॥ २२
यस्या न विद्यते हल्यं तेनाहल्येति विश्रुता ।
अहल्येत्येव च मया तस्या नाम प्रकीर्तितम् ॥ २३

–– अहल्या = अतिशय सुंदर (स्त्री) असा अर्थ ह्या व्युत्पत्तितून प्राप्त होतो. ही व्युत्पत्ति मानवी स्त्रीला लागू पडणारी आहे. त्यामुळे रूपकात्मक अहल्येसाठी तिचा उपयोग नाही.

अहल्या शब्दाच्या –

१ ) अहः लीयते अस्याम् – दिवस जिच्यात विलीन होतो ती = रात्र.

२ ) अहनि लीयमाना – दिवसात विलीन होणारी = उषा.

अशा व्युत्पत्तीच्या साह्याने काहींनी अहल्या म्हणजे रात्र किंवा उषा असा अर्थ केला आहे. व हे निसर्गावरील रूपक सांगण्याचा प्रयत्न केला आहे. पण उषा वा रात्र यांचा सूर्याशी संबंध येतो, इन्द्राशी नव्हे. त्यामुळे अहल्या म्हणजे उषा वा रात्र ह्यापैकी कुठलाच अर्थ उपपन्न ठरत नाही.

एका आधुनिक ऋषितुल्य लेखकाने म्हटल्याप्रमाणे अहल्या म्हणजे पडित जमीन हा अर्थ अगदी ठीक आहे. पण तेवढ्याने निभत नाही. अहल्या शब्दाची व्युत्पत्तिच हा मुद्दा स्पष्ट करील.

वाचस्पत्यम् कोशात न हलं अर्हतीति–अहल्या–म्हणजे जी हलाने–नांगराने नांगरता येण्यासारखी नाही अशी जमीन म्हणजे अर्थातच पाणथळ जमीन. हीच अहल्या शब्दाची व्युत्पत्ति व हाच अर्थ उचित आहे हे पुढील मुद्यावरून स्पष्ट होईल.

अनुक्रमणिका

१ ) गौतम नसेल तेव्हा इन्द्र अहल्येचे धर्षण करी. म्हणजे सूर्य मेघाआड असताना बहुधा पर्जन्यवृष्टि होते.

२ ) इन्द्राला झालेला शाप 'सहस्रभगवान् भव।' व 'विफलस्त्वं भविष्यसि।' त्याचप्रमाणे 'लिंगं ते निपतिष्यति'। – हा आता सांगितलेला अहल्या शब्दाचा अर्थ मानल्यासच संयुक्तिक ठरतो. मेघाला हजारो छिद्रे पडून पर्जन्यवृष्टि झाली. परन्तु ती विफल झाली कारण खाली 'पाणथळ जमीन' होती. पर्जन्यवृष्टि हे इन्द्राचे लिंग = चिह्न होय. तेच इन्द्राचे सुरकार्य आहे.

३ ) गौतम = सूर्य तिचा त्याग करून गेला. याचा अर्थ सूर्यप्रकाश बरोबर न पडल्यामुळे व अतिवृष्टि झाल्यामुळे ती जमीन कृषियोग्य राहिली नाही.

४) अहल्येला दिलेला शाप 'निराहारा वातभक्षा ······ इ. म्हणजे जेथे नुसता वारा आहे. व अन्नादि काही उत्पन्न होणार नाही अशी ती जमीन होऊन राहील.

५) अहल्येच्या कथेतील 'पृथ्वीप्रदक्षिणा' हा पण देखील अहल्येसारखी दुसरी जमीन पृथ्वीवर इतरत्र नाही हेच जाणवून देण्यासाठी आणलेला आहे.

६) प्रभु रामचंद्राला विश्वामित्राने मुद्दाम त्या भागातून नेले व प्रभूने ती जमीन आता कृषियोग्य झाली आहे असे म्हणून आपल्या पादस्पर्शाने तिचा उद्धार केला– म्हणजे ती लागवडीला योग्य जमीन आहे असे स्पष्ट केले.

याप्रमाणे अहल्या = अतिवृष्टीने पाणथळ झालेली दलदलीची जमीन असा अर्थ ठरतो. अनेक वर्षांनंतर ती पुन्हा कृषियोग्य झाल्याचे प्रभु रामचंद्राच्या पादस्पर्शाने सिद्ध झाले.



अनुक्रमणिका

डॉ. गणेश थिटे

# शिवतत्वरत्नाकर : एक धर्मकोश

## उत्तरार्ध

### राजोपभोगशास्त्र

आतापर्यंत सांगितलेले सर्व विषय हे राजकर्तव्ये ह्या गटात आपण समाविष्ट करू शकू. तर ह्यापुढचे विषय हे राजाचे उपभोग ह्या गटात येतील. पण येथेही एक मुद्दा हा ध्यानात ठेवला पाहिजे की राजाच्या चैनीच्या प्रकारांची तपशीलवार माहिती देणारे शिवतत्वरत्नाकर हे एक 'गाईड' असले तरी त्या माहितीचा आधार यातुधर्मात्मक आहे. राजोपभोगांच्या वर्णनातही देवतांची पूजा, ब्राह्मणांना द्यावयाच्या दक्षिणा, विविध प्रकारचे विधी आणि निषेध, अनेक प्रकारचे लोकभ्रम ह्यांचे वैपुल्य आहे आणि त्या दृष्टीने राजोपभोगशास्त्र हेसुद्धा एक धर्मशास्त्रीय अभ्यासाचाच विषय आहे.

राजाचा पट्टाभिषेक शुभलग्नावर, ग्रह उच्चस्थानी असताना किंवा ते स्वस्थानी, मूलत्रिकोणात, असताना करावा (५.११.४). अभिषेकासाठी प्रासादाच्या पूर्वेला भद्रासन तयार करावे. तेथे गंगाजलकुंभ असावेत (१०) अभिषेक-कुंभात मृत्तिका, बैलाचे शिंग, हस्तिदंत, कमळ इत्यादी वस्तू टाकाव्यात (११).

### पुरनिर्माण

राजाला आपल्या वैभवाला अनुकूल आणि उपभोगक्षम असे शहर कसे वसवावयाचे आणि ते भरभराट करणारे कसे ठरेल हे कळण्यासाठी वास्तुकलेची माहिती शिवतत्वरत्नाकरात आली आहे.

शहर जेथे वसवावयाचे ती जमीन सर्व प्रकारची धान्ये होऊ शकणारी, सर्व प्रकारची खनिजद्रव्ये प्राप्त होऊ शकणारी अशी असावी. तसेच ती पुष्कळ पाणी जवळ असलेली, हत्तींनी आपल्या पायांनी तुडवून जेथे रस्ते बनवले आहेत अशी, अनेक नैसर्गिक उद्यानांनी युक्त, नदीशोभित अशी असावी (६.१.८-१०).

अनुक्रमणिका





शहर याचा अर्थ तेथे मोठमोठी घरे, देशोदेशीच्या मालाच्या बाजारपेठा इत्यादी अनेक गोष्टी असल्या पाहिजेत (१५–१६). ते वसवताना पूर्वेला कुंभार, पश्चिमेला खाटिक, उत्तरेला तेली, इशान्येला माळी, कडेने शूद्र, कारागीर, कामगार, वायव्येला चांडाल वसवावेत (१७–१८). शहराभोवती गायी चरण्यासाठी कुरणे असावीत (१९). घरे बांधताना ब्राह्मणांसाठी पांढरी जमीन, क्षत्रियांसाठी लाल, वैश्यांसाठी पिवळी, आणि शूद्रांसाठी काळी जमीन, असावी (२०) गृहरचनाप्रारंभ वैशाख, फाल्गुन, कार्तिक, श्रावण ह्या महिन्यांच्या शुक्लपक्षात रोहिणी, मृग, ज्येष्ठा, स्वाती इत्यादी नक्षत्रांवर करावा (२०–२२). गृहरचनाप्रारंभ करताना पुढीलप्रमाणे शकुन पाहावा. वीतभर खड्डा खणून त्यातील माती पुन: खड्यात टाकावी: खड्डा भरून माती उरल्यास लाभ होतो. कमी भरल्यास तोटा होतो. नेमकी बरोबर ठरल्यास लाभ आणि हानी काहीच होत नाही (३१). गृहनिर्माणासाठी वापरावयाचे लाकूड ज्या वृक्षांपासून घ्यावयाचे ते ज्यांवर पक्ष्यांची घरटी आहेत असे, वारा आणि अग्नी ह्यांनी दूषित, शुष्क, भग्न, वक्र, देवालयातील, शिवक्षेत्रातील, नदीसंगमावरील, काटेरी, क्षीरवृक्ष, चैत्यवृक्ष, तळे, विहीर ह्यांच्यामधील असे नसावेत (३३–३५). गृहनिर्मिती झाल्यावर चंद्रबल पाहून वास्तुपूजा करून, द्विजतर्पण करून राजाने घरात प्रवेश करावा (८७).

## देवळे

शहरात देवळे बांधावीत. शहराच्या पश्चिमेला विष्णू, उत्तरपूर्वार्धात पूर्वाभिमुख असा शिव असावा (५.१०.२०). देवतास्थापन उत्तरायणात करावे. ते पौष महिन्यात केल्यास धनवृद्धी, माघात केल्यास संपत्ती, वैशाखात केल्यास अतिसुख मिळते. आषाढ महिन्यात केल्यास यजमाननाश, श्रावणात केल्यास राजाचा आणि राष्ट्राचा नाश, भाद्रपदात केल्यास महानाश, आश्विनात केल्यास राजाचा नाश आणि कार्तिक, मार्गशीर्ष ह्या महिन्यात केल्यास शत्रूचा उत्कर्ष होतो (५–९). देवळासाठी निवडावयाची भूमी स्निग्ध, पुष्कळ फळाफुलांनी युक्त, पुष्कळ माती असलेली, सपाट, न्याय्य मार्गाने मिळवलेली, गायी जेथे चरतात अशी असावी (२९). वेडीवाकडी, खाचखळग्यांची, षट्कोनी, सुपाच्या आकाराची, मध्ये खोलगट असणारी, वाळूने युक्त, हाडे, मासे, वारुळे, काटेरी वृक्ष, चिखल, दुर्गंध, किडे डुकरे, गिधाडे ह्यांनी युक्त अशी भूमी निंद्य होय (३०–३१). पणतीत गाईचे तूप घालून चार वाती चार दिशांना ठेवाव्यात. प्रत्येक वातीचा ब्राह्मणादी जातीशी संबंध मनातल्या मनात ठरवून वाती पेटवाव्यात. जी वात सर्वांत जास्त पेटेल त्या दिशेला त्या वर्णाच्या यजमानाचे देऊळ बांधावे (३३–३४).

शंकराचे देऊळ बांधताना शंकराच्या पिंडीसाठी लागणारी शिला शोधण्यासाठी प्रथम ब्राह्मणभोजन करवून दगड फोडण्याच्या शस्त्रांची पूजा करून आचार्याला पाठवावे. त्याने शिला शोधताना पुढील मंत्र म्हणावा—त्रिनेत्राय च रुद्राय भूतानां पतये नमः । शिलां दर्शय देवेश प्रसन्नो वृषभध्वज ।।, हे शिला शोधण्याचे काम कैलास पर्वत, गंधमादन श्रीशैल, मेरू, इत्यादी पर्वतांवर करावे (३७–४०). परंतु ह्या पर्वतांवर जाणे कठीण असल्यामुळे सह्य, विंध्य, मलय इत्यादी पर्वतांवरील शिला किंवा कावेरी, शरयू गंगा, गोदावरी, नर्मदा, सिंधु, शोण, सरस्वती, तुंगभद्रा, गोमती इत्यादी नद्यांच्या काठच्या शिला घ्याव्यात ( ४३–४४ ). तेथेही मिळवता न आल्यास कोणत्याही सुंदर प्रदेशातून शिला मिळवाव्यात. (४४). देवतास्थापन करण्याच्या आदल्या रात्री 'नमः शंभो त्रिनेत्राय रुद्राय वरदाय च । वामाय विश्वरूपाय स्वप्नाधिपतये नमः ॥' ह्या मंत्राने शंकराची प्रार्थना करून देवतास्थापनाचा विधी तू मला स्वप्नात सांग अशी भगवान शंकराला प्रार्थना करावी ( ५९–६० ). आणि त्यानुसार सकाळी स्थापना करावी (६०). कारागिराने देऊळ बांधल्यावर त्याच्याकडून मालकाने मंदिराची याचना करावी. त्यावेळी त्याने म्हणावे, " मला तुझ्या शिवमंदिर बांधण्याच्या पुण्याचा दहावा हिस्सा मोबदला म्हणून दे " त्यावर मालकाने म्हणावे की " मी काही तुला त्या पुण्याचा वाटा देणार नाही. तुला हवे असेल तेवढे द्रव्य घे. " मग कारागिराला धन दिल्यावर त्याने देऊळ मालकाच्या स्वाधीन करावे (१३७–१४१). त्यानंतर देवळात शिवाची प्राणप्रतिष्ठा करावी (१४२).

### नाटकशाला

राजाने आपल्या चैनीसाठी नाटकशाला बांधावी. ती चुन्यामळे पांढरी सफेद दिसणारी, उद्यानयुक्त, प्रकाशयुक्त, सोनेरी खांबांनी तेजस्वी, चंदनी खांबांनी सुगंधी, प्रवाळस्तंभांनी रंगीत, अनेक चित्रांनी युक्त अशी असावी ( ६.२.२–७ ).

### चित्रकला

वर नाटकशाला अनेक चित्रांनी युक्त असे म्हटले आहे. त्याचा विस्तार म्हणून चित्रकलेची माहिती शिवतत्वरत्नाकरात आली आहे. नाटकशालेतील चित्रे नानारसयुक्त असावीत आणि ती सूक्ष्मरेखाविशारद कुशल, रंगमिश्रणात निष्णात अशा चित्रकारांनी काढावीत. ( ७–९ ). चित्रे काढण्यासाठी चुन्याची भिंत लेपद्रव्यानी लेपावी. (९–१०). त्यासाठी म्हशीचे ताजे कातडे घेऊन ते पाण्यात




शिजवावे. ते मऊ झाले की त्याचा लगदा पांढऱ्या मातीत मिसळावा. तसेच शंखाचे चूर्ण, पिठी साखर हे पदार्थही त्यात घालून त्याचा भिंतीला लेप द्यावा (१०–१५). करंगळीएवढ्या जाडीची भरीव वेणूची तूलिका तयार करावी. तिच्या टोकाला तांब्याचे टोक बसवावे. त्यात वासराच्या कानाचे केस लाखेने बांधावेत (१९–२३). हे कुंचले स्थूल, मध्य आणि सूक्ष्म अशा तीन आकारांचे असावेत (२४). जी आकृती काढावयाची असेल तिची बाह्यरेषा प्रथम रंगाशिवाय काढावी (२९). मग ती रंगांनी पूर्ण करावी. सर्व आकृती एकाच रंगाची असली तरी त्यात उंच जागी उज्ज्वल रंग असावेत. खोलगट जागी श्यामल रंग वापरावेत (३१). पांढऱ्या रंगासाठी शंखाचा वापर करावा. रक्त वर्णासाठी अळित्याचा, लोहितवर्णासाठी गेरूचा वापर करावा. पिवळ्या रंगासाठी हरताळ, काळ्यासाठी काजळ वापरावे (३३–३८). तसेच मिश्र रंगही वापरावेत. उदाहरणार्थ काजळाचा शंखाशी संयोग करून धूम्रवर्ण तयार होतो. नीलीचे शंखाशी मिश्रण केल्यास कपोतवर्ण तयार होतो. नीळ हरताळात मिसळून हिरवा रंग तयार होतो. गेरूचे हरताळाशी मिश्रण केल्यास गौरवर्ण बनतो. काजळ गेरून मिसळून सावळा रंग तयार करावा. अळत्या-बरोबर काजळ मिसळून पाटलरंग बनवावा. अळत्याबरोबर नीळ मिसळून जांभळा रंग बनवावा (३७–४१). तीक्ष्ण धार असलेल्या क्षुराने कमीअधिक झालेले कुंचल्याचे फटकारे पुसावेत (४५). सर्व चित्रात कडेला काजळाच्या रेघा असाव्यात. (५५). जे चित्र सम्मुख असेल ते सरळ काढावे. इतर तिरकी ठेवावीत. (५६). चित्र काढताना ओळंबा (लंबसूत्र) केसांच्या वरच्या टोकापासून निघून भुवईचा मध्य, नाकाचे टोक, हनुवटी, हृदय, नाभि, अशा क्रमाने पायाच्या नेमका मध्यभागी आला पाहिजे (६५–६६). चित्रकलेत पुढीलप्रमाणे परिमाणे समजावीत. आठ परमाणु म्हणजे एक वालाग्र (केसाचे टोक). आठ वालाग्रे म्हणजे एक लीक्षा, आठ लीक्षा म्हणजे एक यूका. आठ यूका म्हणजे एक यव, आठ यव म्हणजे एक अंगुल, चार अंगुले म्हणजे एक भाग, तीन भाग म्हणजे एक वितस्ती, वितस्तीलाच ताल किंवा मुख असेही म्हणतात (६९–७२). ब्रह्मा, विष्णु, महेश्वर हे १२४ अंगुलांचे, दुर्गा, लक्ष्मी, सरस्वती ह्या १२० अंगुलांच्या, ब्राह्मी, माहेश्वरी, ज्येष्ठा, ह्या ११६ अंगुळांच्या काढाव्यात. माणसाची उंची ७२ अंगुले, गणपती आणि वामन ह्यांची साठ अंगुले, किन्नरांची, पिशाच्याची ५६ अंगुले असावी. (७३–८३). अशा प्रकारे देवांच्या, मानवांच्या, पशूंच्या वगैरे विविध आकृती नाटकशालेत काढून द्याव्यात. (१६१).

नृत्त

नाटकशालेत नटनार्ह स्त्रिया, म्हणजे नर्तिका असाव्यात. हे सांगून पुढे नृत्ताची माहिती दिली आहे. नृत्ताची स्तुति करताना असे म्हटले गेले आहे की नृत्त हे अप्रगल्भांना प्रगल्भत्व देणारे, मन दीन झालेले असणाऱ्यांना उत्साह देणारे, धनिकांचा विलास असणारे, उदारांची कीर्ति असणारे, दुःखितांचे दुःख हरण करणारे आणि चलचित्तांना स्थैर्य प्राप्त करून देणारे असे आहे. (६.३.-३-४). पुत्रोत्पत्तीच्या वेळी इष्ट गोष्टींची प्राप्ती व्हावी म्हणून किंवा पर्वकाळी नृत्तप्रयोग घडवल्यास तो शोभादायक, मंगल, सर्वजनप्रिय असतो. (५) (६). नृत्ताचे तांडव, लास्य, मार्ग आणि देश असे चार प्रकार आहेत. तांडवनृत्त शिवाने तंडूला शिकवले होते. त्यात वेडेवाकडे हावभाव असतात, आणि हे नृत्त उद्धत असते. तंडूंने मुनींना व मुनींनी इतर लोकांना हे नृत्त पुढे शिकवले. (९-१०). लास्यनृत्त हे मुळात शंकराने पार्वतीला शिकवले. पार्वतीने ते बाणासुराच्या मुलीला शिकविले आणि तिने ते गोपींना शिकविले. गोपींनी ते सौराष्ट्रातील स्त्रियांना शिकवले ( ११-१३ ). मार्गनृत्त प्रथम चित्ररथगंधर्वाने अर्जुनाला शिकवले. त्याने विराटाची मुलगी उत्तरा हिला शिकवले. तिच्याकडून ते मत्स्य देशातील इतर लोकांना मिळाले. ( १३-१५ ). त्या त्या देशातील लोकरंजन करणारे असे जे नृत्त ते देशनृत्त. ( १५-१६ ). राजाने नृत्तदर्शनाच्या वेळी पूर्वाभिमुख सिंहासनावर बसावे. तो संगीतगुणदोषज्ञ आणि सर्व कलादक्ष असावा. (१८-२०). नर्तक दृष्टी, हस्त, मस्तक ह्यांच्या हालचाली उत्तमपणे शिकलेला, विविध वाद्यांमध्ये निपुण, सर्व भाषा प्रवीण, नृत्तक्रियाभिज्ञ, निरोगी, सकुलीन, स्वामिवत्सल, जितेन्द्रिय, नेहमी संगीत शास्त्राचे अवलोकन करणारा असा असावा. (२७-३०). नर्तकी फार उंच, किंवा फार बुटकी नसावी. रूप, औदार्य ह्या गुणांनी युक्त. सुमुखी, घनस्तननितम्बिनि, जितश्रमा, निरोगी, प्रियवादिनी असावी (३५-३८). सौराष्ट्र, महाराष्ट्र, ह्यातील नर्तकी उत्तम असतात. मध्य, उत्तर भागातील मध्यम असतात. तर कर्नाटक, द्रवीड, आंध्र ह्या देशातील अधम असतात (३२-३३). त्याचप्रमाणे १५ ते २० वयाची नर्तकी उत्तम, २० ते ३० वयाची मध्यम आणि ३० ते ४० अधम (३५). नृत्तापूर्वी ब्रह्मदेवाला नमस्कार करावा. सरस्वतीवर फुले उधळावीत. शंकराची पूजा करावी. सर्व देवांना आणि ब्राह्मणांना नमस्कार करावा. नंतर सर्व जातीतील सज्जनांना नमस्कार करावा. नंतर पडदा दूर करावा. मग वाद्यवादनास सुरुवात करावी. ( ४०-४४ ). त्यानंतर गायन होऊन मग नृत्तास प्रारंभ करावा (४८-५०). नृत्तामध्ये मस्तकाच्या हालचाली पुढीलप्रमाणे आहेत- धूत म्हणजे डोके हालवणे, ही हाल-

अनुक्रमणिका

चाल नकार किंवा विस्मय दाखविण्यासाठी करतात. ( ६.४.६–७ ). विधुत म्हणजे जोराने हालणे, ही क्रिया भय किंवा थंडी दाखवण्यासाठी करावी (७–८). आधुत म्हणजे डोके वर उचलणे ही क्रिया गर्व दर्शवण्यासाठी किंवा उंचावरील गोष्ट पहाण्यासाठी करावी. ( ९ ). स्निग्ध, हृष्ट, दीन, क्रुद्ध, धृष्ट, भयान्वित, जुगुप्सित व विस्मित या ८ प्रकारच्या दृष्टी स्थायिभावज आहेत (१२–१३). चिंतेच्या वेळी दृष्टी शून्य ठेवावी. दमल्याच्या अभिनयात दृष्टी श्रांत असावी. दुःख, स्वप्न, सुषुप्ती ह्यांचा अभिनय करताना दृष्टी मुकुल ठेवावी. ( ४६–४८ ). उत्साह, गर्व, ह्यांच्या अभिनयाच्या वेळी गाल पूर्ण असावेत. दुःख, हर्ष ह्यावेळी कंपित आणि शीत, ज्वर, भय, स्पर्श रोमांच ह्यांच्या अभिनयात गाल कुंचित असावेत ( १०१ ). हाताच्या पुढीलप्रमाणे हालचाली असाव्यात. अंगठा तर्जनीच्या मुळाशी वाकवून ठेवून बाकीची बोटे पसरलेली ठेवणे, ही पताका नावाची मुद्रा, प्रहाराच्या वेळी करावी (६.५.५२) वरील मुद्रेत अनामिकाही वाकविली तर ती मुद्रा त्रिपताक ह्या नावाची असून त्या मुद्रेचा वापर मंगल द्रव्याचा स्पर्श किंवा तिलक करताना किंवा अश्रू पुसताना करावा (५३–५४). बोटे तळहातावर ठेवून ती अंगठ्याने दाबणे ह्या प्रकारास मुष्टिक असे म्हणतात. ही मुद्रा खड्गग्रहणाच्या वेळी करावी (५८–५९ ), मुष्टिक ह्या मुद्रेत अंगठा वर उचलला की शिखर ही मुद्रा होते. ती लगाम धरताना वापरावी. ( ५९–६० ) अंगठा व तर्जनी ह्यांची चिमूट करणे ह्यास "संदंश" म्हणतात. ही मुद्रा फुले तोडण्याच्या अभिनयात वापरावी. दोन्ही हातांची पताका करून ते जोडणे ही मुद्रा अंजली ह्या नावाची असून देव, गुरु, ब्राह्मण, ह्यांना नमस्कार करताना ती वापरावी ( ८५–८६ ). अशा प्रकारच्या नृत्तविषयक विविध हालचाली शिवतत्त्वरत्नाकरात वर्णिल्या आहेत.

## गायक

गायनाचे वर्णन करताना शिवतत्त्वरत्नाकरात प्रथम नादाचे महत्त्व सांगितले आहे. गायन, वादन, नर्तन ही तिन्ही नादाधीन आहेत ( ६.७.८. ) नादामुळे वर्ण व्यक्त होतो. पद हे वर्णात्मक असते. पदामुळे वाक्य बनते आणि सर्व व्यवहार वाक्यांनी होतो. म्हणून हे सर्व जग नादात्मक आहे ( ९–१० ). नादाचे प्रकार दोन आहेत : १ ) अनाहत नाद ह्या नादाची उपासना गुरूपदिष्ट मार्गाने मोठे लोक करतात. तो रंजनहीन असतो म्हणून त्यायोगे सामान्य माणसाचे मनोरंजन होत नाही ( ११–१२ ). २ ) आहत नाद– ह्या नादावरूनच गीत आधारलेले असते. ते लोकरंजक असते ( १२–१३ ).

ध्वनी व्यक्त होण्यापूर्वी आत्मा मनाला प्रेरणा देतो, मन, नाभिस्थ, अग्नी मारुताला प्रेरणा देतो. तो मारुत ब्रह्मग्रंथिस्थित असतो. तो क्रमाक्रमाने वर येऊन नाभि, हृदय. कंठ, मूर्धा, आस्य ह्या ठिकाणी ध्वनी व्यक्त करतो (१४–१५). नादाचे बावीस प्रकार असून त्याना श्रुति म्हणतात (१९). सात स्वरांमध्ये बावीस श्रुतींचा अंतर्भाव झालेला आहे. षड्ज, मध्यम आणि पंचम ह्यांच्या प्रत्येकी चार चार, निषाद आणि गांधार ह्यांच्या दोन दोन आणि ऋषभ व दैवत ( धैवत ) ह्यांच्या प्रत्येकी तीन तीन श्रुती आहेत (२३–२४).

स्वरांचा निरनिराळ्या देवादी वंशांशी आणि ब्राह्मणादी वर्णांशी गूढ संबंध असल्याचे मानले आहे.. त्यात षडज, गांधार आणि पंचम हे देववंशीय आहेत. पंचम पितृवंशीय आहे ऋषभ व धैवत ऋषि कुलोद्भव आहेत. व निषाद हा स्वर असुरवंशीय आहे (२५–२६). षड्ज, मध्यम हे ब्राह्मण, ऋषभ, धैवत हे क्षत्रिय निषाद व गांधार हे वैश्य आणि अंतःस्वर, काकलीस्वर हे शूद्र आहेत (२६–२७). प्रत्येक स्वराची एक विशिष्ट देवता असून षड्जादिक्रमाने वन्हि, ब्रह्मा, सरस्वती, शर्व, श्रीश, गणेश्वर आणि सहस्रांशु हे स्वरांचे देव आहेत (३०–३१). सा रे हे स्वर वीर, अद्भुत रसांशी, ध हा रौद्र, बीभत्स, भयानक रसांशी; ग नी हे करुण रसांशी आणि म, प हे हास्य-रसांशी संबद्ध आहेत. (३२–३३) ह्या सर्व विभाजनात प्राचीन संगीत-शास्त्रज्ञांचा यातुधर्मात्मक दृष्टिकोन आहे हे लक्षात घेण्याजोगे आहे स्वरां-प्रमाणेच रागांच्या विभाजनात आणि चित्रमय वर्णनातही यातुधर्मात्मकच दृष्टिकोण आहे.

रागाचे स्वरूप सांगताना स्वर आणि वर्ण ह्यांनी विभूषित झालेल्या ध्वनिविशेष लोकांचे चित्त रंजवू शकतो, तेव्हा त्याला राग म्हणावे असे म्हटले आहे (६.८.२७). त्यांचे स्त्री व पुरुष अशा रूपात विभाजन केले आहे. प्रमुख ३२ राग असून त्यातील आठ राग पुरुष आहेत. त्यांच्या प्रत्येकी तीन अशा बायका आहेत, बंगाल रागाच्या धन्यासी, छायागौली कर्णाटगौली, भूपाल वेलावती, मलहरी, बोली. भैरवाच्या देवक्रिया, कुरंजी, मालवाच्या गुर्जरी, गुण्डक्रिया, नारायणी, श्रीरागाच्या आंदोली, भल्लारी, साहुरी, वसंत रागाच्या रामक्रिया, वराली. शुभकैशिकी आणि सारंगरागाच्या देशाक्षी, रीतिगौलिका, पूर्वगौली (२८–३८) अशा प्रकारच्या स्त्रिया आहेत. रागांची कल्पना-रम्य वर्णने पुढीलप्रमाणे केली आहेत. वराटिका ही रागिणी म्हणजे कानात

कल्पवृक्षाची फुले धारण करून, उत्तम कंकणे धारण केलेली, आणि प्रियकराला चवऱ्या ढाळून आनंदित करणारी, सुकेशिनी, सुंदर स्त्री आहे. ( ६३ ) गुण्ड-क्रिया ही रागिणी म्हणजे शोकाने डोळे सुजलेली, खाली तोंड केलेली, शरीराला जमिनीवरची माती लागलेली, वेणी मोकळी सोडलेली. कृश शरीराची आणि प्रियकराशी विरह होऊन रडणारी अशी स्त्री वाटते. ( ७५ ).

राग आणि ते ज्यावेळी गायचे, त्या वेळा ह्यांच्यातही काही गूढ, यातु-धर्मात्मक संबंध आहे. सकाळच्या पहिल्या प्रहरी देशाक्षी,, भैरव, पलमंजरी, भपाली, सावरी, देवक्रिया, गुर्जरी, दुसऱ्या प्रहरी बेलावली, कुरुंजी, शुभ-कौशिकी, तोडी, बराली, धन्यासी, वसंत, तिसऱ्या प्रहरी ललिता, राम-क्रिया, गुंडक्रिया, मल्हारी इत्यादी राग गावेत ( १३१–१३४ ). देशाक्षी, भैरवी, व देवकी हे राग सूर्यांशापासून निघाले असून ते संध्याकाळी गाणे निषिद्ध आहे. सकाळी ते गायिल्यास सुखकर होतात (१३६–१३७). भलत्यावेळी भलता राग गायल्यास किंवा ऐकल्यास प्रायश्चित्त घ्यावे लागेल. हे प्रायश्चित्त म्हणजे विष्णु किंवा शिव यांचे स्मरण करणे किंवा देवताविषयक, पुण्यकारक किंवा आध्यात्मिक असे गायन करणे किंवा ऐकणे. विवाह वगैरे प्रसंगी देवतास्तुतिपर असे गायन अवेळा रागात असले तरी दोष नाही ( १४२–१४४).

गायकांचे प्रकार पुढीलप्रमाणे पाडले गेले आहेत. जो शब्दविद्येत प्रवीण, शास्त्रात कुशल, लोकव्यापारकोविद. गीतनिपुण, स्वरप्रबंधकर्ता, देशभाषा-विशारद, निर्भय प्रतिभावान, स्वरपाटवनिपुण असा गायक असेल तो उत्तमो-त्तम गायक ( १५२ ). बेसूर गाणाऱ्याला स्थानभ्रष्ट असे म्हणतात. नाकात गाणारा तो कपिलगायक ( १५७ ). दात ओठ खावून गाणारा आणि म्हणा-वयाचे पद्य जणू चावल्यासारखे गाणारा तो संदष्टगायक ( १५९–१६० ). पुनः पुनः श्वासोच्छ्वास जोरात करणारा तो फूत्कारी गायक (१६१–१६२). मानेच्या, कपाळावरील शिरा दिसत असणारा, नेत्र लाल होणारा तो कंपकगायक ( १६२–१६३ ). जो मान वाकडी करून गातो तो वक्री, मोठा आ करून गातो तो कराली, डोळे मिटून गाणारा निमीलन (१६३–१६६). वाग्गेयकाराने तयार केलेली रचना ऐकून ती न विसरता सावधानपणे शिकणारा तो शिक्षक; गाताना रसनिर्मिती करणारा तो भावक; श्रोत्यांचा अभिप्राय जाणून त्यानुसार गाणारा व रंजविणारा तो रंजक, स्वतःच्या स्निग्ध गाण्याने आनंदित होत, पुलकित होत गाणारा तो रसिक गायक, दुसऱ्याच्या गायनाची नक्कल करणारा तो कुटिकार; स्वर, वर्ण, ताल ह्या तिन्ही गोष्टी उत्तम व्यक्त करणारा,

चांगल्या आवाजाचा तो सकंठ, शास्त्रानुसार निर्दोष गाणारा तो क्रियापर गायक ( १७३–१८० ) असे गायकांचे विविध प्रकार आहेत.

तालाचे महत्त्व सांगताना असे म्हटले आहे की गीत, वाद्य, व नृत्त तिन्ही तालांवर आधारलेले आहे ( ६.९.१ ). ताल ह्या शब्दातील त म्हणजे शंकर आणि ल म्हणजे पार्वती ( ३ ) असे सांगून तालाला धार्मिक महत्त्व दिलेले आहे. तालाची उत्पत्तीसुद्धा शंकराच्या मुखातून झाली असे सांगून तालाचे धार्मिक रूप स्पष्ट केले गेले आहे. शंकराच्या पाच मुखांमधून पाच प्रमुख ताल निर्माण झाले ( ५ ). पहिल्या चच्चत्पुटतालात गुरु, गुरु लघु प्लुत असा क्रम असतो. दुसऱ्या चाचपुटतालात गुरु, लघु, गुरु असा क्रम असतो. तिसऱ्या षट्पितापुत्रकतालात प्लुत, लघु, गुरु, गुरु, लघु प्लुत असा क्रम असतो. चौथ्या संपद्वेष्टतालात गुरु, गुरु, गुरु प्लुत असा क्रम असतो. पांचव्या उद्घट्ट ह्या तालात गुरु, गुरु गुरु असा क्रम असतो ( २५–२७ ). मर्दलवाद्य तयार करण्यासाठी जे लाकूड घ्यावयाचे ते वेगवेगळ्या वर्णासाठी वेगवेगळे घ्यावे. ब्राह्मणांसाठी चंदन वृक्षाचे, क्षत्रियांसाठी रक्तचंदनाचे, वैश्यांसाठी खदिराचे आणि इतरांसाठी इतर वृक्षांचे घ्यावे. पण नीरस, खाऱ्या जमिनीत वाढलेल्या, जीर्ण किंवा वाताहत झालेल्या अशा वृक्षांचे लाकूड कधीही घेऊ नये. तालवाद्यांसाठी वापरावयाचे कातडे मेदायुक्त, जीर्ण, फाटलेले, कावळ्यांनी चोच मारलेले, जळलेले किंवा बुरसटलेले नसावे ( १४४–१४५ ). वाद्यांचे एकूण चार प्रकार आहेत. अवनद्ध वाद्यांमध्ये झल्लरी, मुरज, भेरी, पटह, डमरू, दुंदुभि ही वाद्ये येतात. सुषिर वाद्यांमध्ये मुकुरी, मधुकरी, वंश, शंख, ही वाद्ये येतात. घनवाद्यांमध्ये कांस्यताल, घंटिका ही वाद्ये आणि तंतुवाद्यांमध्ये वीणेसारखी वाद्ये समाविष्ट आहेत.

## वृक्षशास्त्र

संगीत हे जसे राजांच्या उपभोगाचे एक अंग त्याचप्रमाणे उद्याने, वने ही आणखी अंगे आहेत. त्यामुळे उद्यानांची निर्मिती, झाडे लावणे त्यांची वाढ, त्यांचे आरोग्य इत्यादी रीतीने वृक्षशास्त्र शिवतत्वरत्नाकरात समाविष्ट झाले आहे. इतर शास्त्रांप्रमाणेच हेही तथाकथित शास्त्र विविध लोकभ्रम, विधि-निषेध, यातुधर्मात्मक विधी इत्यादींनी भरगच्च असल्यामुळे त्याचे धार्मिक इतिहासात महत्वाचे स्थान आहे.

उद्यानांची स्तुति करताना आणि त्याचे महत्व सांगताना असे म्हटले गेले आहे की सर्व सौख्यांचे साधन, विलासिनींच्या मनाला आनंददायक व भृंग्यांनी

युक्त, अशा वापी ज्यात आहेत अशी उद्याने ज्या राजाजवळ असतील तोच खरा राजा. (६.१०.४). तारुण्यसुंदर शरीर, सुंदर स्त्रिया, कलावंत मित्र, वीणेचा नाद, धन इत्यादी सर्व गोष्टी विहारोपवने नसतील तर व्यर्थ होत. (५). तसेच वृक्षांचे महत्व सांगताना असे म्हटले आहे की दशकूपसमा वापी दशवापीसमो ह्रद दशह्रदसमः पुत्रः दशपुत्रसमो द्रुमः ॥ म्हणजे वृक्ष हा दहा मुलांच्या बरोबरीचा आहे. क्रीडोद्यानाचे धार्मिक महत्त्व असे की ते तयार केल्यामुळे भगवान शंकर प्रसन्न होतात. ( १०–११ ). अशा रीतीने उपभोग, हा धर्माचाच भाग आहे.

वृक्षांबाबत पुढील प्रकारचे लोकभ्रम उल्लेखिलेले आहेत. घराच्या पूर्व दिशेला न्यग्रोध वृक्ष असल्यास सर्व इच्छा पूर्ण होतात. दक्षिणेला उदुंबर, पश्चिमेला पिंपळ, उत्तरेला प्लक्ष असे वृक्ष लावावेत. ( ७–८ ). कोणताही वृक्ष घराच्या दाराशी लावू नये. त्याची सावली घरावर पडू देऊ नये. (१३) बदरी, कदली, दाडिमी, हे वृक्ष घराजवळ लावू नयेत लावल्यास समृद्धीला विघ्न येते (१४). वृक्षांचे पुढील प्रकार आहेत. वनस्पती या प्रकारात फुलांशिवाय फळे येणारे वृक्ष हे समाविष्ट होतात. ज्यांना फळे व फुले दोन्ही येतात त्यांना द्रुम म्हणतात. तणावांच्या योगे वाढणाऱ्या त्या लता ज्यांना खूप बुंधे असतात. त्यांना गुल्म म्हणतात. ( २८–२९ ). जंबू, चिंच कपित्थ, बदरी, बिल्व, हे बीजज वृक्ष आहेत. तांबूली, सिंधुवार तगर हे कांडज वृक्ष, दाडिमी, प्लक्ष, करवीर, वट, उदुंबर हे बीजकांडज वृक्ष होत. कुंकुम, आर्द्र, रसोन हे वृक्ष कंदोद्भव आहेत. कमळे बीजकंदोद्भव असतात ( ३०–३४ ).

झाडे जेथे लावायची ती भूमी विष, पाषाण, वाल्मीक, बिळे, ह्यांनी युक्त किंवा पाणी दूर असलेली किंवा वाळूची नसावी. (१९). मात्र निधि, देव, राजे ह्यांच्या यातुधर्मात्मक प्रभावामुळे जमीन प्रतिकूल असली तरी वृक्ष वाढू शकतात (२६). योग्य ऋतूत पिकून पक्व झालेले फळ शुष्क झाल्यावर त्याच्यातील बी काढून घेऊन, त्यावर दूध शिंपडून, वावडिंगयुक्त तुपाचा धूप त्याला द्यावा (३५). बी पेरण्याआधी स्नान, देवपूजा, गुरूना नमस्कार, ब्राह्मणांना भूमिदान, ह्या गोष्टी करून प्रथम राजाने स्वतः बी पेरावे. मग परिजनांनी पेरावे (४०). वृक्षारोपण विशाखा श्रवण, अश्विनी, हस्त, या नक्षत्रांवर करावे, झाडे मंडप, स्वस्तिक इत्यादी आकारात किंवा चौकोनी सरळ रेषेत इत्यादी पद्धतीने लावावे (४८). त्यात योग्य अंतर असावे. ती जर फार दाट लावली तर त्यांची वाढ होत नाही. त्यात अंतर फार असल्यास त्यांना वादळाचे वेळी

अनुक्रमणिका

धोका निर्माण होतो (४९–५०). नवीन झाडाना सकाळ संध्याकाळ पाणी घालावे. त्यांचे थंडी, वारा, ऊन, ह्यापासून रक्षण करावे (५४). झाडांच्या आसपास गवत, झुडपे वाढल्यास ती उपटावीत (५९). झाडांना दृष्ट लागू नये म्हणून पांढरा भात, दही, सैंधव, एकत्र करून झाडाभोवती टाकावे (६३–६४) पतंग, उंदीर, मुंग्या ह्यापासून झाडाँना धोका निर्माण झाल्यास पुढील मंत्र १०८ वेळा जपून पानावर लिहावा, ओं स्वस्ति किष्किंधावस्थितः प्रकटपराक्रमन्तर्हितार्कमण्डलोपजीवितः श्रीहनूमानाज्ञापयति मूषककीटपतङ्गपिपीलिकाशलभकरभकीट गान्धिकानिवर्हैर्न स्थातव्यम् । क्रममाणस्य शरीरनिग्रहं समावर्तयति । तस्य वानरसिंहस्य क्रममाणस्य सागरम् । कक्षान्तर्गतो वायुः जीमूत इव नर्दति । हुं फट् नमः । हा मंत्र लिहिलेले पान मग जमिनीत पुरावे. म्हणजे उपद्रवी किडे नष्ट होतात. (६४–६७). उपद्रवी प्राणी नष्ट करण्याचा हा यातुधर्मात्मक उपाय आहे.

उद्यानात लतागृहे, क्रीडाशैल तयार करावे. उद्यानात मोर, असावेत. ते मंगल असतात. पुष्करिणी, वापी इत्यादी तयार करून त्यात कासवे सोडावीत (६८–७८). पुष्करिणी इत्यादी करण्यासाठी पाणी कुठे लागेल त्याचा अंदाज पुढील प्रकारच्या चिन्हांवरून घ्यावा जांभळाच्या झाडाजवळ वारूळ असेल तर त्याच्या दक्षिणेला दोन पुरुष खोलीवर गोड पाणी असते ( ८६ ). तसेच निर्गुंडी किंवा बदरी ह्यांच्या जवळही वारूळ असेल तर तेथे पाणी असते ( ८८–९० ). वृक्षाची एखादीच फांदी पांढरी झाली किंवा वाकली तर त्या फांदीच्या टोकाच्या खाली पाणी असते ( १११ ). विहीर पुढील नक्षत्रावर खणावी– हस्त, मघा, अनुराधा, पुष्य, धनिष्ठा, इ. ( १३९ ). विहीर जर गावाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात खणली तर मुले मरतात, वायव्येला खणली तर स्त्रिया मरतात, आग्नेयेला खणली तर भय, दाह निर्माण होईल, ईशान्येला खणली तरी भीती असते. बाकीच्या दिशा शुभ आहेत. ( १४१ )

झाडांचे पोषण व्हावे म्हणून पुढील प्रकारच्या उपायांचा अवलंब करावा. खर्जूर, बिल्व, लिकुच, यांना पांढरी मोहरी, आंब्याला कोंड्याने युक्त पाणी, ऐरावत वृक्षाला तांदूळ, मांस ह्यांनी युक्त असे पाणी वृद्धिदायक असते ( ६.११.२ ). आवळ्याला उडीद, नारळाला यवाचे पीठ प्रिय असते ( ३ ). घृताचा धूप, यवयुक्त पाणी शिंपडणे, नेहमी दूध व पाणी शिंपडणे, वावडिंग तीळ, ह्यांच्या लगद्याचा लेप हा वृक्षांची वृद्धी करतो. ( २० ).

## वृक्षचिकित्सा

माणसांप्रमाणेच वृक्षांना वात, पित्त व कफ ह्यामुळे रोग होतात. वातप्रवृत्ती झाडे कृश, उंच, रुक्ष, निद्राहीन, लवकर फले, पुष्पे न धारण करणारी, अल्प हालचाल करणारी असतात. पित्त प्रकृतीच्या वृक्षांना ऊन सहन होत नाही. ते शाखाहीन, पांडु, अकाली फळे पिकणारे असतात. कफप्रकृतीच्या झाडांच्या फांद्या व पाने स्निग्ध असतात. त्यांना योग्य वेळी फळे, फुले येतात व ते लतांनी वेढलेले असतात. ( ३१–३३ ). सुस्निग्ध मांसरसांनी वात नष्ट होतो. सुस्निग्ध मधुरजलांनी पित्त नष्ट होते. तिखट, आंबट, तुरट उष्णजलांनी कफ नष्ट होतो ( ३५ ). एखादा वृक्ष, विजेने कोळपला गेल्यावर त्याला पुनरुज्जीवन देण्यासाठी घृत, उशीर, मधूक, मूग, उडीद, यव, तीळ हे पदार्थ एकत्र कुटून त्यात दूध व पाणी घालून त्याचा झाडाला लेप द्यावा म्हणजे वृक्ष सुधारतो ( ४१–४२ ). झाड शुष्क होऊ लागल्यास त्याला साखर, तीळ, गोक्षीर व पाणी घालावे (४७).

## चित्रीकरण

वृक्षांबाबत काही चमत्कार घडवून आणणे ह्याला चित्रीकरण म्हणतात. चित्रीकरणाच्या बऱ्याचशा युक्त्या यात्वात्मक वाटतात. यव, तीळ, निशावृक्षाची पाने ही कापसाला मुळाशी घातली तर पेटत्या अग्नीच्या रंगाचा कापूस येतो (५१). कवठ आणि बेल ह्याना तूप, गूळ दूध, मध ह्याचा उपचार दिला असता अमृतासारखी गोड, अतिशय मांसल, आणि बिया नसलेली अशी फळे येतात (१०). ज्येष्ठमध, साखर, कुष्ठ व मध ह्याचे मोदक एखाद्या झाडाला घातल्यास त्याला बिनबियाची फळे येतात (५६). कोंबड्याच्या रक्ताचा डाळिंबाच्या बीजाला एकवीस वेळा लेप देऊन ते पेरल्यास झाड लवकर वाढून लवकर फळे येतात (६५). कुमुदाचा कंद वेगवेगळ्या रंगात ठेवून तूप, मध, ह्याचा त्याच्या मुखावर लेप देऊन ती पेरली असता त्या त्या रंगाची कुमुदे असतात (६९). नरमांस, वसा रक्त, हस्तिदंत, ह्याचे चूर्ण घातलेले पाणी केळीला घातल्यास तिला आंबे येतात (७७).

## डोहाळे

झाडाना फुले यावीत म्हणून करावयाचे डोहाळे हेसुद्धा यात्वात्मकच आहेत. सुंदर स्त्रीच्या लाथ मारण्याने अशोक वृक्ष फुलतो, बकुल तोंडातील मद्याच्या चुळीने, कुरबक आलिंगनामुळे, तिलकवृक्ष तिने पाहिल्यामुळे, सिंधुवार

तिने फुंकल्यामुळे, प्रियाळवृक्ष तिच्या गाण्याने आणि नमेरुवृक्ष तिच्या हसण्याने फुलतो (९२-९४)

## कामशास्त्र

अशा प्रकारे उद्यान तयार झाल्यावर त्यात स्त्रियांसह विलास करावा असे सांगून शिवतत्त्वरत्नाकरात कामशास्त्र वर्णिले आहे. राज्यसुखाचे स्त्री हे सार आहे असे शिवतत्त्वरत्नाकरात सांगितले आहे, ( ६-१२-५ ). मत्त हत्ती, वायुवेग घोडे आणि पूर्णेंदुवदन नारी ह्यांची प्राप्ती हे शिवपूजेचे फल आहे असेही म्हटले आहे ( ७. १२. १८७. १८८ ). अशा रीतीने काम हा सुद्धा धर्माचाच भाग आहे हे कळून येईल. स्त्रियांचे उत्तम गुण सांगताना अचापल्य, लज्जा, दाक्षिण्य, अनुकूलता, मधुर स्वर, लावण्य, शुश्रूषा, धर्मज्ञता, सत्य, पतीचे दोष लपवणे, इत्यादी सांगितले आहेत (६.१२.७.९) स्त्रियांमध्ये रूपवती श्रेष्ठ, रुपवतींमध्ये सयौवना श्रेष्ठ, त्यामध्ये रतिकौशलसारज्ञा श्रेष्ठ, त्यांमध्ये संगीतज्ञा श्रेष्ठ, त्यांमध्ये नर्तकी श्रेष्ठ असे म्हटले आहे ( १० ). स्त्रियांचे पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी हस्तिनी असे वर्गीकरण केले आहे (१३-१५). स्त्रीची विरागकारणे सांगताना कार्पण्य, अतिमान, रोग, विरह, पारुष्य, मालिन्य, शोक, दारिद्र्य, पतीचे शरीर लहान असणे, इत्यादी कारणे दिली आहेत ( १०७ ). स्त्रियांना वश करण्यासाठी काही यात्वात्मक युक्त्या सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ दूर्वा सावलीत वाळवून गायीच्या तुपात वात भिजवून त्या वातीने जाळाव्यात. मग ती राख शिंगाच्या डबीत ठेऊन कपाळाला तर्जनीने लावावी ते पाहिले म्हणजे स्त्री वश होते (६.१३.७५-७७). हा यात्वात्मक प्रकार आहे हे उघड आहे. वसंत, ग्रीष्म ऋतूत स्त्रियांकडून वारा घातला जात असता राजाने प्रासादाच्या ऊर्ध्वभागात किंवा प्रांगणात रात्रीचा पूर्वार्ध घालवावा ( ६-१४-१२-१४ ). मग इतराना निरोप देऊन प्रियेसह उत्तरार्ध घालवावा ( १५ ) वर्षाऋतूत वारा व पावसाचे पाणी न येईल अशा प्रासादात काल व्यतीत करावा. ( १७ ).

## स्नानोपभोग

राजाचे स्नानगृह घराच्या ईशान्येला असावे. त्याला सोन्याचे खांब, स्फटिकाची वेदी आणि पिवळे पडदे असावेत ( १९-२० ). स्नान अंगाला तेल लावून म्हणजे अभ्यंग करावे की नाही ह्याबद्दल पुढीलप्रमाणे शकुन अपशकुन आहेत. रविवारी अभ्यंगस्नान केल्यास पीडा होते. सोमवारी केल्यास

कांती प्राप्त होते. मंगळवारी केल्यास शत्रू निर्माण होतो. बुधवारी केल्यास लक्ष्मी मिळते. गुरुवारी केल्यास संपत्ती नष्ट होते. शुक्रवारी केल्यास संकट येते आणि शनिवारी केल्यास प्रचंड धन मिळते ( २२ ). अशा रीतीने अभ्यंग स्नानास सोमवार, बुधवार व शनिवार हे दिवस शुभ असून त्या दिवशी जो राजा अभ्यंग स्नान करील त्याचे आयुष्य वाढते, आणि संपत्ती विपुल होते असे म्हटले आहे ( २३ ). तृतीया, षष्ठी, दिनक्षय, दशमी ते चतुर्दशी, पंचमी, पर्वदिन ह्या दिवशी अभ्यंग करू नये. तृतीयेला केल्यास सुखनाश, षष्ठीला केल्यास आयुर्नाश, चतुर्दशीला केल्यास रोग इत्यादी वाईट फले मिळतील (२५–२८). केवडा, जाई, पुंनाग, चंपक, ह्यांचा वास दिलेले तीळ पिळून काढून मिळालेले तेल अभ्यंग स्नानासाठी वापरावे ( २३–२४ ). राजाला सुंदर स्त्रियांनी सोन्याच्या कलशांनी स्नान घालावे ( ४७–४९ ). केसांना सुगंधी आवळ्याचा लेप देऊन मग ते उष्ण पाण्याने धुवावेत ( ५० ). वंग, चोल, कलिंग, मलय, येथे निर्माण झालेल्या हळदीला धुपाचा सुगंध देऊन राजाला लावावी व नंतर राजाला स्नान घालावे ( ५१ ).

## पादुकाभोग

राजाने पादुकांचा म्हणजे पादत्राणांचा भोग पुढीलप्रमाणे घ्यावा. राजाच्या चपला श्रीपर्णीच्या, हरिचंदनाच्या, लाकडांच्या आणि चहूबाजूंनी शोभित अशा असाव्यात. किंवा त्या चामड्याच्या, किंवा हस्तिदंती असाव्यात आणि त्यात सोन्याचे काम केलेले असावे (५६). राजाच्या पादुका सुदृढ, मऊ, मनोहर, सुस्पर्श असाव्यात (५७).

## विलेपनभोग

राजाने विलेपनभोग पुढीलप्रमाणे घ्यावा. चंदन, अगर कर्पूर, कस्तूरी, कुंकुम, केशर ह्यांचे विलेपन राजाला करावे. काखेत, कानाच्या संधीत, नाभी-जवळ, मांड्यांच्या सांध्यामध्ये स्वेदगंधाचा नाश व्हावा म्हणून विलेपन करावे ( ६२ ). तसेच कपाळ, बाहु, कंठ, छाती ह्यांवरही विलेपन करावे ( ८६ ). मुख सुगंधी रहावे ह्यासाठी मुरा, किंजल्क, कुष्ठ ह्या वनस्पतीचे चूर्ण सकाळ संध्याकाळ चाटावे ( ६–१५–७२ ).

## वस्त्रभोग

राजाने नव्या वस्त्राचे परिधान नक्षत्रांची अनुकूलता, बघून करावे व वस्त्रभोग घ्यावा. अश्विनी नक्षत्रावर वस्त्र परिधान केल्यास वस्त्रे अधिकाधिक

मिळतात. रोहिणीवर केल्यास धनवृद्धि, पुनर्वसूवर धनप्राप्ती, पुष्यावर सौख्याची वाढ, उत्तरेवर यशोलाभ, हस्तावर कर्मसिद्धी, चित्रेवर शुभ प्राप्ती, इत्यादी प्रकारची फले आहेत. ( ६. १६. ३–५ ). गृहोत्सव, विवाह, दुसऱ्या राजाची भेट, उत्सव, गीत, नृत्तविनोद, देवकर्म, यज्ञ, युद्ध महोत्सव ह्यावेळी नवे वस्त्र परिधान करावे (८–१०). विलेपन झाल्यानंतर राजाने वस्त्रभाण्डाधिकाऱ्यांना उत्तम आणि पुष्कळ वस्त्रे आणण्याचा आदेश द्यावा (१०–११). ही वस्त्रे दुसऱ्या द्वीपांवरची, सिंहल देशातील, चीनमधील असावीत (११–१२). ती निळी काळी, धूसर तांबूस, जांभळी अशा प्रकारे रंगीत, मऊ, तलम, वजनाला हलकी, किमतीला भारी, टिकाऊ असावीत (१३–१९). वसंत ऋतूत पोपटी रंगाची, किंवा मयूरीच्या कंठाच्या रंगाची, रेशमी किंवा कापसाची असावीत. ग्रीष्म ऋतूत वस्त्रे विरल, व शुभ्र असावीत. वर्षाऋतूत लोकरीची व तांबडी असावीत. शरद ऋतूत तांबुस, राखी रंगाची आणि थंडीत जाड असावीत (२१–२४).

माल्यभोग

राजाच्या माल्यभोगाचे वर्णन करताना असे सांगितले आहे की चंपक, मल्लिका, केवडा इत्यादींच्या माला राजाने धारण. कराव्यात ( २८–२९ ). त्या प्रथम गुरु, देव, ह्यांना अर्पण करून मग वापराव्यात (३६). येथे माल्योपभोग हा धर्माचे अंग असलेला दिसेल. प्रत्येक प्रकारच्या फुलांच्या माळा घालण्यास विविध प्रकारचे यातुभैषज्यात्मक महत्त्व आहे. उदाहरणार्थ मोगऱ्याने कफाचा नाश होतो. दृष्टि पुष्ट होते. पण मोगरा पुनः पुनः वापरल्यास केसात उवा होतात ( ४० ). शतच्छदाचे पुष्प धारण करण्याने केस वाढतात. डोक्याची गरगर थांबते ( ४१ ). जातीपुष्पामुळे त्रिदोष नष्ट होतात; अंगदाह, नेत्ररोग नष्ट होतात, ( ४२ ). केवड्यामुळे कफ, वात ह्यांचा नाश होतो. पित्त वाढते ( ४३ ).

भूषणभोग

राजाने भूषणांचा म्हणजे दागिन्यांचा उपभोग पुढीलप्रमाणे घ्यावा. गळ्यात मोठ्या मोठ्या मोत्यांची एकसरी माळ घालावी. तसेच नीललंबनिका नावाचा रत्नहार घालावा. त्यात नीळ, माणिक्य आणि मोती असावेत (५३). सोन्यामध्ये विविध रत्ने खोवून पदक तयार करून ते घालावे ( ५९ ). केयूर, अंगद, कटक इत्यादी बाहुभूषणे घालावीत ( ६२–६४ ). विविध प्रकारच्या अंगठ्या घालाव्यात. त्यातील अष्टवज्र नावाच्या अंगठीत आठ कोनात आठ

हिरे आणि मध्ये दुसरे एखादे रत्न असते (६६). रविमंडळ नावाच्या अंगठीत वर्तुळाकार असे हिरे बसवलेले असतात आणि मध्ये दुसरे एखादे रत्न असते. (६७) नवग्रहप्रकारच्या अंगठीमध्ये नऊ ग्रहांची प्रतीके असलेली नऊ रत्ने समाविष्ट असतात (६८). स्त्रियांनी पुढीलप्रमाणे दागिने घालावेत. सोनेरी फुलांनी युक्त मोत्याची जाळी हे वेणीभूषण म्हणून घालावे (८८–८९). सोन्याचे, अनेक रत्नांनी खचित पद्मही वेणीवर घालावे (८७–८८). तसेच नऊ किंवा दहा स्थूल मोत्यांची सरिका गळ्याचा दागिना म्हणून घालावी (९०–९१). सोन्याच्या रत्नखचित बांगड्या हातात घालाव्यात (९२–९५). चार बोटे रुंद, सोने व रत्ने ह्यांनी बनविलेली, सोन्याच्या घंटांनी युक्त अशी कांची म्हणजे कंबरपट्टा घालावा (८८–८९). सोन्याचे बुडबुडे तयार करून त्यात रत्ने घालून त्यांपासून पायात बांधावयाचे नूपुर तयार करावेत (१०२–१०३). तसेच सोन्याच्या पादमुद्रिका म्हणजे पायांच्या बोटामध्ये घालावयाच्या अंगठ्या कराव्यात (१०८). दागिन्यांना प्राचीन भारतात यातुधर्मात्मक अर्थ होता ही गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे. भूषण शब्दाचा शब्दशः अर्थ समर्थ करणारे असा आहे. अलंकार शब्दाचाही अर्थ तोच आहे. दागिने हे मूलतः सौन्दर्यवृद्धीसाठी नसून सामर्थ्यवृद्धीसाठी असत. वेगवेगळ्या दागिन्यांचे महत्त्व शिवतत्त्वरत्नाकरात पुढीलप्रमाणे सांगितले गेले आहे. कानाचे दागिने पवित्र व पुण्यकारक असतात. सोने युक्त मोती भाग्यकारक असतो. सोने आणि रत्ने ह्यांनी बनवलेले पदक धन, कांति ह्यांची वाढ करते. अंगठीमुळे कीर्ती, पुण्य, आयुष्य मिळते. तिच्या सहायाने दुसऱ्यांना वश करता येते. अलंकार हे सर्वसामान्यपणे पवित्र करणारे, विषदोषनिवारक असे असतात. प्रत्येक रत्नाची अधिदेवता असते आणि ह्या देवता प्रसन्न झाल्यास त्या विपुल संपत्ती देतात. (११४–११८).

## रत्नपरीक्षा

रत्नांची पारख करून मगच रत्ने घ्यावीत. कारण धूर्त लोक बनावट रत्ने प्रयत्नपूर्वक तयार करतात (६.१७.१६७). चांगल्या हिऱ्यामध्ये पुढील गुण असतात. षट्कोनी, हलका, टोके तीक्ष्ण असलेला असतो. मल, बिंदु, रेखा, काकपद, इत्यादी प्रकारचे दोष असलेला हिरा ग्राह्य नसतो. तशा प्रकारच्या हिऱ्यामुळे संकटे येतात. उदाहरणार्थ बिंदुदोष असला तर त्यामुळे आयुष्य धन नष्ट होते (१४). काकपद दोष असल्यास मृत्यु येतो (१९) मोत्यांची उत्पत्ती सांगताना असे म्हटले आहे की सूर्य स्वाती नक्षत्रात असताना शिंपल्यात पड-

णारे जलबिंदूचे मोती बनतात. ( ४७–४८ ) मोती खडबडीत, तेजोहीन, मलिन, तांबूस, मिठासारखा, तुकडा पडलेला, गाठींनी युक्त असा नसावा ( ५८ ). हिऱ्याची परीक्षा घेताना तो हिऱ्याने फोडावा. बनावट असला तर फुटतो. मिठाच्या पाण्याने धुऊन खोटे मोती ओळखता येतात. माणिक्य वगैरे रत्ने घासून किंवा फोडून तपासावीत. घासल्यावर मऊ झाली किंवा फोडल्यावर तेज कमी दिसले तर ती खोटी समजावीत ( १६७–१७० ).

## अन्नभोग

अन्नभोगाचे वर्णन करण्याआधी शिवतत्त्वरत्नाकरात प्रथम अन्नाचे महत्त्व असे सांगितले आहे की अन्न हे सर्व प्राणिमात्रांची तृप्ती करणारे असते (६.१८.३). बत्तीस हात लांब आणि आठ हात रुंद अशी पाकशाला तयार करावी. तिच्यात धूर बाहेर पडण्याची व्यवस्था असावी (५). पूर्व दिशेला चूल करावी. वायव्येला उखळ करावे. दक्षिणेला लाकडे ठेवावीत. नैर्ऋत्येला विळी, पश्चिमेला पाण्याचा कुंभ ठेवावा, उत्तरेला सूप आणि केरसुणी ठेवावी. ईशान्येला मुसळ आणि जाते ठेवावे (६–९). चूल लोखंडी, विटाची किंवा मातीची असावी (६–७). तांब्याच्या भांड्यात शिजवलेले अन्न वातघ्न असते. लोखंडी भांड्यातील पांडुक्षयनायक असते. काशाच्या भांड्यातील अन्न त्रिदोषनाशक असते. सोन्याच्या भांड्यात शिजवलेले, विषनाशक, वीर्यकर असते (१०–१३). पळी लोखंडी, चांदीची, सोन्याची किंवा नारळाच्या करवंटीची किंवा लाकडी असावी (२०–२१). उखळाचे विवर सोळा बोटे रुंद आणि सात बोटे रुंद असावे (२३). सूप हत्तीच्या कानाच्या आकाराचे असावे. कोंडा किंवा खडे दूर करण्यासाठी जे साधन वापरले जाते त्याला चाळणी म्हणतात. ती वेणूपासून बनवलेली बारीक भोके असलेली असावी (२४–३५). अन्न तयार करणारे आचारी राजाच्या स्वतःच्या देशातील, प्राज्ञ, सदाचारी स्वदारनिरत, स्वच्छ, रागद्वेषविहीन असे असावेत. केस, नखे कापलेल्या त्याने हात पाय धुऊन पाक करावा (२६–२८). भात करताना तांदुळाच्या तिप्पट पाणी घालावे व ते तापवून उकळले म्हणजे तांदूळ त्यात टाकावेत. मग थोड्यावेळाने त्यातील शीत दाबून तो शिजला की नाही ते पहावे. शीत मऊ झाल्यावर त्यात दूध किंवा तूप टाकावे (३६–३९). हरबरे, मसूर, उडीद, मूग ह्यांच्या डाळींचा स्वयंपाकात वापर करावा (३६–३९). डाळीत पाणी घालून अग्नीवर पात्र ठेवावे. मग त्यात हिंगाचे पाणी व मीठ हळद घालावी, फळे, पाले, कंद, मूळ, फुले, शेंगा ह्या प्रकारच्या भाज्या बनवाव्यात ( ६२–६३ ). पोलिका कर-

ताना कणकीचे गोळे हातावर थापून गोल, पातळ करावेत व कोळशावर भाजावेत. ह्या पोळ्या किंचित काळ्या होतात. व त्यांना अंगारपोलिका म्हणतात. दुसऱ्या प्रकारच्या पोलिका खापरांवर भाजून तयार करता येतात ( ६.१९.८-१० ). इडली उडदाची डाळ आंबवून तयार करावी. त्यांना घृत, हिंग, जिरा ह्यांचा धूप द्यावा ( १७-२० ). क्षीरपाक नावाचा पदार्थ तयार करण्यासाठी दूध उकळवून त्यात आंबट ताक घालावे. त्यातील पाणी फेकून देऊन घट्ट भाग गाळून वेगळा करावा. त्यात तांदुळाचे पीठ घालून त्यांचे विविध आकाराचे गोळे करावेत व तुपात तळावेत. नंतर ते साखरेच्या पाकात ठेवावेत ( २४-२७ ). अशा प्रकारे अनेक पदार्थांच्या पाककृती शिवतत्त्वरत्नाकरात दिल्या आहेत. भोजनमंडपाचे वर्णन करताना असे सांगितले आहे की तो पांढऱ्या वस्त्रांचा असावा. त्याला रत्नांचे खांब असावेत ( ६.२०.४-५ ). त्यात राजाने गुरु, पुत्र, पौत्र, वनिता मित्र ह्यांसह प्रवेश करावा. ( ६ ) भोजन करताना पूर्वेला तोंड केल्यास आयुष्याची प्राप्ती होते. दक्षिणेला केल्यास यश मिळते. पश्चिमेला केल्यास श्री व पुष्टी मिळते. उत्तरेला केल्यास सत्यवाक्याचे फळ मिळते ( ९-१० ). येथे भोजनभोगाचा यातूशी असलेला संबंध प्रतीत होईल. राजाला भोजनातून विषप्रयोग केला जाण्याची शक्यता असते. त्यामुळे भोजनापूर्वी अन्नाची परीक्षा केली पाहिजे ( १३-१४). भोजनापूर्वी देवाला नैवेद्य दाखवून मग अन्नग्रहण करावे ( ४३ ). येथे भोजनभोग हे धर्माचे अंग आहे हे स्पष्ट होईल. जेवताना प्रथम गोड, मग खारट, आणि शेवटी तिखट खावे (४३-४४). मधून मधून पाणी प्यावे (५१). जे पाणी चिखलाने, शेवाळाने युक्त असेल ते किंवा डबक्यातील वाईट गंध व वर्ण असलेले पाणी टाळावे ( ६७ ). भोजनानंतर डाव्या कुशीवर दोन घटिका पडावे किंवा शतपावली करावी ( ८८ ).

पादाभ्यंजनभोग—

मग कामिनींनी मऊ हातांनी राजाचे पादाभ्यंजन करावे ( ९१-९२ ). वसंत ऋतूत तूप, दही, थंड दूध, उन्हाळ्यात लोणी, पावसाळ्यात दूध, ताक, शरद ऋतूत शतधौत घृत, चंदनाचे पाणी, हेमंत ऋतूत व शिशिर ऋतूत चंदनाने पादाभ्यंजन करावे ( ९३-९४ ). मग पाय धुवावेत ( ९६ ) आणि शय्येवर झोपावे.

शय्योपभोग

शय्योपभोगाची माहिती सांगताना शिवतत्त्वरत्नाकरात असे म्हटले आहे की शय्या हंसाच्या पिसांची. सावरीच्या कापसाची किंवा साध्या कापसाची किंवा पानांची, केसरांची फुलांची किंवा कातडी पिशव्यामध्ये पाणी भरून तयार केलेली अशी असावी (१४०–१४१). पलंग हस्तिदन्ती, लोखंडी, खालीवर होणारा, वेताचा, कापसाच्या पट्यांनी तयार केलेला, चंदनाच्या लाकडानी बनवलेल्या झोपाळयाचा असा असावा (१५२–१५९). कापसाची शय्या बनवताना त्यातील सरकी काढून टाकलेली असावी (१८६). झोपाळयाचा पलंग चंदनी लाकडाचा, रत्ने जडवलेला, सोनेरी साखळचा असलेला, असावा (१५९–६०). पलंगाच्या लाकडासाठी चंदन, देवदार, साग इत्यादी वृक्ष शुभ; परंतु विजेने कोळपलेल्या, वारा, हत्ती ह्यांनी पाडलेल्या, भुंगे, पक्षी ह्यांनी घरटी केलेल्या, चैत्य, श्मशानज, रस्त्यावरच्या, अर्ध्या वाळलेल्या, लतांनी झाकलेल्या किंवा काटेरी, मोठ्या नद्यांच्या संगमाजवळच्या, देवळातील, दक्षिण दिशेतील वृक्षांचे लाकूड अशुभ असून ते घेऊ नये (१६४). निषिद्ध अशा वृक्षाच्या लाकडापासून बनवलेल्या पलंगाचा किंवा आसनाचा वापर केल्यास कुलविनाश, रोग, खर्च, कलह आणि अनेक प्रकारचे अनर्थ उद्भवतात (१६५). राजाच्या शय्येची लांबी शंभर अंगुळे असावी. ती कमी किंवा अधिक असल्यास अशुभ (१७०). शय्यागृहातील दिवा न कंपित होणारा, फार तेजस्वी नसणारा असावा. तो मंगलप्रद असतो (१८५–१८६). दिवा जर धूर येणारा, ठिणग्यांनी युक्त, फडफड आवाज करणारा असेल तर तो अशुभ असतो (१८७–१८८). राजाने झोप घेऊन ब्राह्म मुहूर्तावर मंगलध्वनींनी, भाटांच्या आवाजांनी जागे होऊन पुढील मंगल गोष्टी पाहाव्यात. आपला उजवा हात, आकाश, अग्नी वासरासह अशी गाय, रत्ने, आरसा बीप, गाईचे दूध, सुवर्णकलश, माकड, दही, दूर्वा, गुरू, आईवडील, देवता (१९०–१९३). अशा प्रकारे राजाचा शय्योपभोग हाही यातुधर्मात्मक दृष्टीने अर्थपूर्ण आहे.

वैद्यकशास्त्र :

वर दिलेले सर्व प्रकारचे भोग हे उत्तम आरोग्य, दृढ शरीर असणाऱ्या राजालाच घेता येणे शक्य आहे. त्यामुळे राजाच्या आरोग्याची काळजी घेण्याच्या दृष्टीने शिवतत्त्वरत्नाकरात आयुर्वेदीय माहिती समाविष्ट करण्यात आली आहे, आयुर्वेदाची परंपरा सांगताना तो ब्रह्मदेवाने प्रजापतीला त्याने







अश्विनांना, अश्विनांनी सहस्राक्षाला, सहस्राक्षाने अग्नीला आणि अग्नीने अग्निवेश्य ऋषीला कथन केला असे म्हटले आहे (६.२१.४–५). वैद्यकशास्त्राच्या वर्गीकरणाचा एकप्रकार पुढीलप्रमाणे आहे. रसवैद्यक हे दैव, औषधी गुळ्या वगैरे देणे हे मानुष, शस्त्रक्रिया आणि दहनक्रिया करणे हे आसुर आणि सिद्धवैद्यक हे मांत्रिक (१७-१८). वैद्य हा सर्व विद्या गुरूकडून शिकलेला असावा. तो क्रियाकुशल, निःस्पृह, धैर्यधर, शुद्ध असावा (१८). ज्याच्या हातावर पताका, कुंभ, कमळ, मत्स्य, धनुष्य, ह्यांची चिन्हे असतात, तो वैद्य अमृतहस्त नावाचा वैद्य होय. तो अर्थातच चांगला (१९). परंतु जो वैद्य नैष्ठिक नाही, निर्दय, लोभी आहे, ज्याला गुरू नाही, हातावर काळ्या रेघा आहेत तो दग्धहस्त ह्या प्रकारचा वैद्य निंद्य असतो (२०). रोगाची वर्णने करताना त्यांना सशरीर बनवून त्यांचे तपशील चित्रमय पद्धतीने सांगितले आहेत. उदाहरणार्थ खोकला हा कासवाच्या आकाराचा, कृश, हातात घंटा धारण केलेला, डोळे विस्फारलेला असतो (३.५.४५). राजयक्ष्मा हा कृश शरीराचा आहे (४७). अर्शरोग वक्र असून हातात खड्ग व खेट धारण करणारा असतो (४८). महोदर हा रोग स्थूल शरीराचा असून तो रेड्यावर बसलेला असतो (५३). रोगांची कारणे देताना इतर काही कारणांबरोबर ग्रहांची जन्मनक्षत्रपीडा, पापाचरण अशीही कारणे दिली आहेत (६.२१.१०६-१०७). ज्वराला रुद्रनयनोद्भव असे नाव दिले आहे (१११). रस्त्यावर, विहिरीत, झाडाच्या सावलीत, प्रेताच्या, ब्राह्मणाच्या गृहात निर्माण झालेल्या, वारुळांवर निर्माण झालेल्या, अग्नीमुळे जळलेल्या किंवा पाण्याने कुजलेल्या, किड्यांनी खालेल्या कर्मकांड न करता आणलेल्या औषधांचा चांगला परिणाम काही होत नाही. (२०२–२०३). प्रशस्त नक्षत्रावर, चांगल्या दारी, पवित्र बनून औषधी आणावी. त्याआधी सुप्रभा देवीचे स्मरण 'सुप्रभायै नमः' ह्या मंत्राने करावे (२०४–२०५). अशा रीतीने वैद्यकशास्त्राचे यातुधर्मात्मक स्वरूप स्पष्ट होईल.

### विषचिकित्सा

वैद्यकशास्त्राचाच एक भाग असलेली विषचिकित्सा शिवतत्त्वरत्नाकरात आली असून तीही यातुधर्मात्मकच आहे. सापांच्या ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि प्रकारच्या जातिभेदाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की अग्नीपासून निर्माण झालेले, संध्यारंगाप्रमाणे तांबूस असे अनंत आणि गुलिक ह्या नामाचे साप हे ब्राह्मण, पिवळ्या रंगाचे, इन्द्रापासून जन्मलेले, वासुकि, शंखपाल ह्या नावाचे साप क्षत्रिय, वायूपासून जन्मलेले, काळ्या रंगाचे, तक्षक, महापद्म ह्या नावाचे

हे वैश्य साप आणि समुद्रापासून जन्मणारे, हिमाच्या रंगाचे, पद्म, कर्कोटक ह्या नावाचे साप हे शूद्र असतात (६.२६.९). ब्राह्मण साप पर्वत, उद्यान, तळी, गुहा, धान्याची गुदामे, ह्यात राहतात. प्राकार, तोरण, मोठे प्रासाद ह्यांवर क्षत्रिय साप राहतात. वैश्य साप घरे, गोठे, ह्यात राहतात आणि शूद्र साप अरण्ये, नदीकाठ ह्यावर राहतात (१५). सर्पीण आषाढ वा श्रावण महिन्यात गर्भवती होते आणि कार्तिक वा मार्गशीर्ष महिन्यात अंडी घालते. ती अंडी अर्ध्या महिन्यात फुटतात व त्यातून लाल लोकरीच्या तंतूप्रमाणे दिसणारी पिले बाहेर पडतात. त्यातील हालचाल-शून्य पिलांना सर्पीण खाते. त्यातून तीन पिले उरतात. एक स्त्री, एक पुरुष व एक नपुंसक. ह्या पिलांची वाढ होऊ लागून मग अेकविसाव्या दिवशी त्यांना दात येतात. सापांना जर मोर, ससाणा, मुंगूस, मांजर, गायीच्या खुराखाली चिरडले जाणे, वीज पडणे, दावाग्नी यासारख्या कारणानी मृत्यू आला नाही तर ते शंभर वर्षे जगतात (२०-२९). साप भीती, उन्मत्तपणा, भूक, पूर्ववैर, गर्विष्ठपणा, कालाची प्रेरणा, इत्यादी कारणांनी डसतात ( ३५-३६ ). सर्पदंश जर मंगळवार रविवार, शनिवार ह्या वारी संध्याकाळी झाला तर तात्काळ मृत्यू येतो. तसेच पंचमी, षष्ठी, अमावास्या, अष्टमी ह्या तिथींवर दंश झाला असेल तर मनुष्य मरतो, (९०-९२). मूळ, आश्लेषा, भरणी, अश्विनी, कृत्तिका, विशाखा ह्या नक्षत्रांवर दंश झाला तरी मृत्यू घडतो (९४-९५). सर्पदंश झाल्याचे विषवैद्याला कळविण्यास येणाऱ्या दूताबद्दल विविध प्रकारचे शकून सांगितले गेले आहेत. हा दूत जर नैऋत्य, आग्नेय, दक्षिण ह्या दिशांकडून आला असला तर सर्पदष्ट व्यक्ति मरते. इतर दिशांकडून आला तर जगते ( ९५-९६ ), तो दूत जर तेलाने शरीर माखलेला, केस मोकळे सोडलेला, हातात शस्त्र घेतलेला, अडखळत बोलणारा, दोन्ही हात वर केलेला, रोगाने पीडलेला, गाढव किंवा माजलेला रेडा ह्यावर बसलेला एकच वस्त्र धारण केलेला किंवा विवस्त्र असेल तर साप ज्याला चावला आहे तो मरतो म्हणून अशा प्रकारचा दूत बोलाविण्यास आल्यावर सर्पवैद्याने त्याच्याबरोबर जाऊ नये. ( ९६-९९ ). वारुळ, उद्यान, चैत्य, स्मशान, नदीसंगम, पडीक घर चौक ह्या जागी सर्पदंश झाला असेल तर बरा करता येत नाही. त्यामुळे मृत्यू ओढवतो (१०७-१०८ ). सर्पदंशावर उपचार करताना चावलेला भाग कापावा, किंवा सोन्याने जाळावा ( १४ ). जखमेवर कानातला मळ लावावा, थंड पाण्याने अभिषेक करावा. गोमयांबु तुपासह प्यावे (६.२७.१६-१७). सर्पदंशावर उतारा

म्हणून एक गरुडमंत्र दिला आहे. त्या मंत्रात गरुडाला नमस्कार केला आहे ( ६ ). दुसऱ्या एका सर्पोच्चाटनमंत्रात 'ओं स्वः सर्पकुलाय स्वाहा' असे शब्द आहेत ( ६१ ). शिवतत्वरत्नाकरात इतर प्राण्यांच्या विषाचीही अशीच यातुधर्मात्मक चिकित्सा दिली आहे. उदाहरणार्थ कुत्र्याच्या विषावरच्या मंत्रात अलर्काधिपते यक्ष सारमेयगणाधिप । अलर्कदष्टमेतं मा निर्विषं कुरु मा चिरम् । ( ९६ )

## राजाचे आणखी काही भोग : आस्थानभोग :

राजाच्या इतरही अनेक भोगांचे शिवतत्त्वरत्नाकरात वर्णन केले आहे. त्यात राजाचा दरबार वर्णन करताना राजसिंहासन कसे असावे ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे. राजसिंहासन सोन्याचे असावे. ते रत्नखचित, स्फटिकाच्या आठ सिंहाच्या मस्तकांनी भूषित झालेले असावे (७.१.६ ). राजासाठी असणारी चामरे मोराची पिसे किंवा चमरीचे शेपूट यांपासून बनवलेली असून त्याचे दांडे सोन्याचे व रत्नखचित असावेत ( १०–१२ ). दरबारात विविध देशातून आणलेल्या अन्तःपुरस्थ स्त्रिया, राजकुमार, पुरोहित, अमात्य, सामंत, धर्माधिकारी, संगीताधिकारी, इत्यादी सर्वांनी राजाकडे पाहात असे बसावे ( २७–५६ ). राजसभेतील सेवक सुगुणी, नम्र असावेत, त्यांनी राजाच्या कडेला फार लांब नाही फार जवळ नाही असे बसावे ( ५७–५८ ). राजाच्या सेवकांनी राजाला जो प्रिय त्याच्याशी प्रेमाने आणि त्याला जो अप्रिय त्याच्याशी वैराने वागावे. धन्याने वस्त्र, अलंकार, ह्यासारखी दिलेली बक्षिसे त्यांनी स्वतः आनंदाने धारण करावीत, दुसऱ्या कुणाला देऊ नयेत. सेवकांनी धन्यापेक्षा श्रेष्ठ किंवा त्यासारखा वेष धारण करू नये. त्याच्यासमोर जांभई, शिंका, ढेकर, हसणे, ह्या क्रिया तोंड झाकून कराव्यात. सभेत नाक शिंकरू नये, पाय पसरू नयेत, झोपू नये, धन्याला एकवचनी हाक मारू नये, शत्रूची स्तुती धन्यापुढे करू नये ( ६२–६९ ). शरणागत राजांनी दंडवत प्रणाम केल्यावर त्यांना सन्मानाने राजाने आसन देऊ करावे. त्यांना अलंकार, वस्त्रे, हत्ती, गावे इत्यादी देऊन संतुष्ट करावे, व रम्य प्रासादात ठेवावे ( ८४ ).

## इन्द्रजालोपभोग :

आस्थानभोगाचाच एक म्हणजे राजसभेत जादूचे प्रयोग पाहून त्यांचा उपभोग घेणे. ह्या भोगाची माहिती सांगताना शिवतत्वरत्नाकरात जादूच्या खेळांचे म्हणजे इंद्रजालाचे प्रयोग कसे करावेत ती माहिती दिली आहे. जादूचे

प्रयोग करताना जादूगाराने प्रथम स्वतःच्या रक्षणाचे उपाय योजून मगच जादूचे प्रयोग करावेत. त्यासाठी स्वतःच्या नाकाच्या भोकांना गायीचे तूप लावावे. तोंडात दोन बिंबीफले ठेवावीत ( ७. २.५–६ ). पायाच्या बोटामध्ये श्मशान-वृक्षाच्या मुळीची अंगठी करून ती मृतनिर्माल्यासह तांबडया दोऱ्याने बांधावी म्हणजे दुसऱ्यांची नजरबंदी करता येते ( ७–८ ). जादूचे प्रयोग करताना सरडयाचे चूर्ण उपयोगात आणावे. त्यासाठी मंगळवारी पुष्य नक्षत्र असताना सुंदरसा सरडा पकडून आणून तो कोऱ्या भांडयात ठेवावा. मग धूप, दीप, अक्षता, गंध, तांबडी फुले, नैवेद्य ह्यांयोगे त्याची पूजा करून त्याच्यावर स्वतःच्या डाव्या हाताच्या करंगळीच्या रक्ताचा अभिषेक करावा. ओं, ऱ्हां, ऱ्हीं, ऱ्हूं स्वाहा हे शब्द म्हणावेत. हे कर्मकांड सात दिवस करावे. मग तो सरडा मेला की तो सावलीत सुकवून त्याच्या चूर्णाने आपल्या कंबरेला लेप दिल्यास जादूगार सवस्त्र असला तरी विवस्त्र आहे असे लोकांना दिसते (१०–१३). ते चूर्ण तालपत्राला लावले की साप तयार होतो (१५). एखाद्या भांडयाला ते चूर्ण, रातकमळाचा कंद, आणि विडयाची पाने ह्यांचा लेप दिल्यास ते भांडे तरंगू शकते (१६). अंकोलाच्या बीचे चूर्ण घेऊन त्याला तिळाचे तेल लावावे व पुनः पुनः वाटावे आणि तेल काढावे. हे तेल एखाद्या हजामत केलेल्याच्या डोक्याला लावले असता तत्क्षणी पूर्ववत केस येतात (१८–२१). हेच तेल लावून एखादी आंब्याची कोय पुरल्यास तत्क्षणी आंब्यांनी डवरलेला आम्रवृक्ष तेथे निर्माण होतो ( २२ ). गुंजाचे पीठ करून ते लाकडी चपलांना लावावे घातल्यावर मनुष्य कोसभर अधांतरी चालू शकतो ( ३७–३८ ). पीठ, काजळ, लाख, ह्यांची बाहुली करावी. मग तिला स्त्रीजरायूचा धूप दिला असता ही निर्जीव बाहुलीसुद्धा एकदम रडू लागते ( ४५ ). घुबडाच्या कवटीत तुपाचे काजळ काढावे. ते काजळ डोळयात घातल्यास अंधारातही पुस्तक वाचता येते (४९). कडू भोपळयाचे तेल, कबूतर, बगळा ह्यांची विष्ठा, शिखिमूल ही वनस्पती, गाढवाचे हाड ह्या सगळयांचे पीठ करून त्याचा जादुगाराने आपल्या कपाळी तिलक लावल्यास लोकांना जादुगाराच्या जागी दशमुख रावण दिसू लागतो (६१–६२). बिब्याचे तेल मेलेल्या माशांवर टाकून ते पाण्यात टाकल्यास ते जिवंत माशासारखे दिसतात ( १२४ ). अशा सारख्या सर्व जादूच्या खेळाच्या वेळी पुढील मंत्र जपावा– ओं नमो भगवते रुद्राय ओड्डामरेश्वराय बहुरुपाय नानारूपधराय हस हस नृत्य नृत्य मद मद नानाकौतुकेन्द्रजालदर्शनाय हुं फट् स्वाहा स्वाहा ( १४६ ). ह्या मंत्रावरून इंद्रजालाचेही रूप धार्मिक असल्याचे लक्षात येईल. जादुगाराने मेष, बेडूक, घुबड ह्यांची असा आणून त्याचा आपल्या

अनुक्रमणिका

शरीराला लेप दिल्यास तो अग्नीतून चालत जाऊ शकतो. त्याला अग्नी जाळत नाही ( १८१ ). अशाप्रकारे अग्निस्तंभन करता येते.

विविध सिद्धि

इंद्रजालाच्या प्रयोगांशी सिद्धींचे सादृश्य असल्यामुळे जरी हा विषय शिवतत्त्वरत्नाकर ह्या ग्रंथात अन्यत्र आला असला तरी तो येथेच सांगणे सुसंगत होईल. सिद्धींचेही स्वरूप यातुधर्मात्मकच आहे. पूर्वीच्या ऋषींनी कुटजाद्रीवर चक्रतीर्थ, नाहुष, रजताश्म इत्यादी तीर्थाजवळ राहून अनेक सिद्धी मिळविल्या (५.१.१५–२०). अशा सिद्धी मिळवू इच्छिणाऱ्याने कृष्ण-पक्षात चतुर्दशीला संध्याकाळी सावरीच्या वृक्षापुढे पूजा करून त्या वृक्षाला तांबडे वस्त्र गुंडाळावे. मग ओं हां अमृतस्यन्दिनि अमृतं स्रव स्वाहा ह्या मंत्राने कुऱ्हाड अभिमंत्रित करून वृक्षावर प्रहार करावेत मग वृक्षातून येणारा चीक एकत्र करून त्याला भृंगशतावरीची आणि गुळुचीच्या रसाची भावना द्यावी आणि बोराएवढाल्या गोळ्या करून दररोज खाव्यात. दोन आठवड्यात जुने दात, केस, नखे, पडून जाऊन नवे येतील. मग मनुष्य सोळा वर्षाइतका तरुण होऊन हजार वर्षे जगेल ( ३४–४२). अशाप्रकारची ही वयःस्तंभसिद्धी आहे. कालवंचनसिद्धी म्हणजे मरण टाळणे. चंद्राला भोक दिसणे, आरशात सूर्य निष्प्रभ दिसणे. स्वतःच्या सावलीचे डोके न दिसणे ही मृत्यूची सूचक चिन्हे असतात (७०). परंतु योगाभ्यास, मंत्र, ध्यान, रसायन ह्यांच्या योगे कालवंचनसिद्धी मिळते आणि मृत्यू टाळता येतो ( ८५ ). ह्रीं सं प्रे क्षां द्रों द्रां क्रौं समोहनि चण्डे कालसंकर्षणि नमः ह्या मंत्राने स्वाहा म्हणून आहुति द्याव्यात म्हणजे मृत्यू टाळता येतो ( ८८ ). पादुकासिद्धी म्हणजे वाटेल तितके अंतर न श्रमता चालता येणे. ही सिद्धी मिळवण्यासाठी घोड्याची लाळ आणि अंकुली तेल ह्यांनी युक्त करून पांढऱ्या मोहरीचे पीठ करावे आणि ते पायांना लावावे. म्हणजे शंभर योजने चालता येते (९२). उंटाच्या कातड्याच्या पादुका म्हणजे चपला पायात घातल्यास शंभर योजने चालता येते ( ९३ ). पादुकासिद्धी मिळवण्यासाठी ओं नमो भगवते रुद्राय भूत-वेतालग्रसनाय शंखचक्रगदाधराय हल हल महते चंद्रवेतालाय ओं फट् स्वाहा ह्या मंत्राने पादलेप अभिमंत्रित करावा (९९). मृतसंजीवनी विद्या मिळविण्या-साठी ज्यावेळी सूर्य पुष्य नक्षत्रात असेल त्यावेळी गुडुचीचे मूळ आणावे. त्याचे चूर्ण उष्ण पाण्याबरोबर पिण्याने मृत्यू दूर करता येतो. त्यावेळी अघोरेभ्योऽथ रुद्ररूपेभ्यः हा मंत्र म्हणावा ( ११९–१२० ). अदृश्यकरणीविद्या

मिळविण्यासाठी विवस्त्र होऊन स्मशानात 'ओं ऱ्हीं ऱ्हीं स्फीं स्फें श्मशानवासिनि प्रसीद स्वाहा' ह्या मंत्राचा जप करावा म्हणजे यक्षिणी संतुष्ट होऊन अेक वस्त्र देते. ते वस्त्र पांघरणारा मनुष्य कुणाला दिसू शकत नाही ( १२३-१२४ ). गुप्तधन शोधून काढण्यासाठी पुढील उपाय योजावेत. पावसाळ्यात किंवा थंडीत जेथे सरडा, विंचू, किंवा साप सतत राहतो तेथे धन असते असे समजावे. तसेच अिंधनाशिवाय जेथे अग्नी असेल. कारणाशिवाय पाण्यात भोवरा असेल तेथे गुप्त धन असते ( ५.४.२-४ ). गुप्तधन शोधण्याचे काम मदतनीसाशिवाय करू नये. मदतनीस सात, पाच किंवा तीन असावेत ( ७ ). मदतनीस शांत, उपकारशील, मदमात्सर्यहीन, मानी, सात्त्विक, धार्मिक, कुलीन, श्रीमंत, शिवभक्त असावेत ( ९-१० ). ते दुराचारी, नास्तिक, दांभिक, विषयासक्त, क्रूर, अहंकारी, शठ, हावरट, चोर, देवद्विजगुरुस्त्रीनिंदक नसावेत ( १२-१३ ). अत्यंत काळ्या कावळ्याची जीभ, हृदय व नाक आणून त्यांना रुओीचा कापूस बांधून वात तयार करावी. ती शेळीच्या तुपाने पेटवून त्याचे काजळ काढून ते डोळ्यात घातल्यास गुप्त धनाचा निधी दिसतो. हे काजळ करताना दिवा माणसाच्या कवटीचा करावा आणि काजळही माणसाच्या कवटीतच धरावे. ( २२-२६ ). अशा रीतीने शिवतत्वरत्नाकरात अिन्द्रजालादी विद्या आल्या आहेत. येथे हे लक्षात घेतले पाहिजे की करमणुकीच्या जादूच्या प्रयोगात जादुगार स्वतः अज्ञानात नसतात. प्रेक्षक मात्र अज्ञानात असतात. परंतु शिवतत्वरत्नाकरात वर्णिलेल्या वरील प्रयोगांचे यातुधर्मात्मक स्वरूप पाहिल्यावर प्रेक्षकांप्रमाणेच जादुगारही अज्ञानातच असतो असे दिसते आणि त्याच्या जादूच्या प्रयोगांच्या यशस्वीपणाबद्दल साशंकताच निर्माण होते.

### काव्यभोग :

राजाच्या भोगासाठी राजसभेत जसे जादुगार आवश्यक तसे कवीही आवश्यक असतात. ते नाटक आणि अलंकार ह्यात तज्ज्ञ असावेत. ( ७.३.२ ) असे सांगून शिवतत्त्वरत्नाकरात काव्यशास्त्राची माहिती आहे. अ ते क्ष ह्या वर्णांपासून तिङन्त आणि सुबंत पदे तयार होतात ( ७.३.८ ). पदसमूहाला वाक्य म्हणतात ( ९ ). ही वाक्ये जेव्हा कवीने रचलेली असतात; सार्थ, सरस असतात, अलंकारयुक्त, निर्दोष असतात; तेव्हा ती काव्य ठरतात ( ९-१० ). काव्याचे गद्य, पद्य, मिश्र असे मुख्य प्रकार आहेत ( १० ). अितर प्रकारात महाकाव्य हा प्रकार संस्कृतमध्ये सर्गबद्ध असतो, प्राकृतात आश्वासबद्ध असतो ( १२ ). जर कथानक कल्पित असेल तर ती "कथा"

आणि ते जर खरे असेल तर ती " आख्यायिका " असे गद्यसाहित्याचे दोन प्रकार आहेत. ( १३ ). छंद, य म, त, र, ज, भ, न, स, ह्या आठ गणांनी व्याप्त आहे. ह्या गणांची यातुधर्मात्मक अशी फले आहेत. य हा वारिरूप आहे व तो धन देतो. र अग्निरूप असून दाहभय निर्माण करतो, त आकाशरूप असून अैश्वर्य नष्ट करतो; म सोमरूप असून सुखदायक आहे; ज सूर्यरुप असून रोग निर्माण करणारा आहे; स वायुरुप असून प्रवास घडवतो; म भूमिरुप असून शुभद आहे; न दिग्रुप असून शुभद आहे. काव्याचा प्रारंभ करताना शुभफलदायी गणांचा आणि वर्णांचा वापर कवीने करावा म्हणजे राजाचे व कवीचे कल्याण होते ( २३–२६ ). विविध वर्ण काव्याच्या प्रारंभी आले असता त्यांचे यात्वात्मक फल पुढीलप्रमाणे मिळेल. अ, आ– आनंद, अि, अी– धन, ऋ ॠ, ऌ, ॡ – अपख्याति, अे ओ, अै, औ– सुख, क ते घ– सुख, च– अपयश, छ– प्रीति, सौख्य, ट, ठ– खेद, ड– शोभा, ण– भ्रमण, त– सुख, म– युद्ध, द, ध– सुख, प ते म– सुख, य– लक्ष्मी, र– दाह, ल, व– संकट, श, स– सुख, ष– खेद, ह– दाह, व्यसन, ळ, क्ष– सर्वसमृद्धी ( २६–३१ ), काव्याच्या सुरवातीला क्षखेरीज कोणतेही जोडाक्षर त्याज्य आहे. शुभ वर्ण अशुभ वर्णाबरोबर संयुक्त झाल्यास अशुभ फल देतो. काव्याच्या सुरवातीला देववाचक, कल्याणवाचक, शब्द ठेवावेत. मग त्यातील गुण किंवा वर्ण अशुभफलदायी असले तरी शुभच फल मिळते. ( ३३–३४ ). अशा रीतीने काव्यशास्त्रही धर्माचाच भाग असल्याचे दिसून येअील. कवींचे प्रकार शिवतत्त्वरत्नाकरात पुढीलप्रमाणे पाडले आहेत. काचिक हा कवी स्वतःच्या मनाच्या सुखासाठी काव्य रचणारा असतो. वाचिक हा कवी केवळ वागाडम्बर करणारा असतो. आर्थकवी अर्थचित्रप्रधान काव्य करतो. शिल्पक शब्द आणि अर्थ दोन्हींचेही चमत्कार करतो. मार्दवानुग कवी शब्द आणि अर्थ ह्यांच्या मृदुतेच्या मागे लागलेला असतो. विवेकी कवी श्लेष, गुण, दोष जाणणारा आणि महाकवींच्या मतानुसार जाणारा, शास्त्रालंकारसंस्कारी असतो. भूषणार्थी कवी केवळ अलंकारांना महत्व देतो ( ५४–५८ ). प्रत्येक रसाचा रंग आणि देवता ठरलेल्या आहेत. श्रृंगाररस कमळाच्या रंगाचा, विष्णु ही देवता असलेला आहे; हास्य रस पांढरा स्वच्छ असून त्याची देवता गणपती ही आहे. करुणरसाचा रंग कबुतरासारखा, देवता यम; रौद्र रसाचा वर्ण जास्वंदीप्रमाणे लाल, देवता रुद्र; वीररसाचा वर्ण गौर, देवता इंद्र; भयानकरसाचा वर्ण धूम्र देवता महाकाल; अद्‌भुताचा रंग सोनेरी व देवता ब्रह्मा; बीभत्स रस निळ्या मेघाप्रमाणे वर्णाचा, देवता नंदी; शांत रस स्फटिकवर्णाचा, त्याची देवता ( १६० – १६४ ). हास्य शृंगारापासून,

करूण रौद्रापासून, अद्भुत वीरापासून आणि भयानक बीभत्सापासून निर्माण झाला आहे (१६५). शृंगार आणि बीभत्स हे एकमेकांचे शत्रुरस आहेत, तसेच वीर आणि भयानक, रौद्र आणि अद्भुत, हास्य आणि करुण हे रस एकमेकांचे शत्रु आहेत. शांत रसाचे इतर सर्व रसांशी शत्रुत्व असून तो रस सर्वश्रेष्ठ आहे (१६६–१६७).

## पुत्रोपभोग

राजाने पुत्रोपभोग कसा घ्यावा हे सांगण्याचे निमित्ताने राजाने आपल्या मुलाचे संस्कार, शिक्षण, विवाह इत्यादी गोष्टी कशा कराव्यात याची माहिती शिवतत्वरत्नाकरात आली आहे. राणीला गर्भधारणा झाल्यानंतर तिच्या ठिकाणी गर्भवतीपणाची चिन्हे दिसू लागतात. उदाहरणार्थ गाल पांढुरके होणे, जठर उन्नत होणे इत्यादी (७.७.३–४). मग तिसऱ्या महिन्यात पुंसवन हा संस्कार करावा. तो करताना श्रवण, मृगशीर्ष हस्त, पुष्य, पुनर्वसू मूळ ह्यापैकी एखादे नक्षत्र आणि मंगळवार, गुरुवार ह्यासारखा एखादा वार असावा ( ४–५ ). ह्या संस्कारामुळे गर्भ पुरुष बनतो ( ७ ). आठव्या महिन्यात सीमंतोन्नयन करावे. त्यावेळी गर्भवतीला उंबराच्या फळांची माळ घालावी. साळीच्या काट्याच्या टोकाने राजाने पत्नीचा भांग पाडावा. त्यावेळी वीणावादन, सामगायन व्हावे. तसेच इतरही मंगल वाद्ये वाजवावीत. ब्राह्मणाला गायी, भूमी सोने, वस्त्रे द्यावीत. (७–१२). प्रसूतीनंतर जातकर्म करावे हा विधी राजाने आपल्या स्वतःच्या गृह्यसूत्रात सांगितल्याप्रमाणे करावा. त्यात सोन्याच्या अंगठीला मध, तूप, लावून ते बालकाला चाटवावे. मग आईचे दूध त्याला पिऊ द्यावे. त्यानंतर आभ्युदयिक श्राद्ध करावे ( १२–१४ ). दहाव्या दिवसानंतर अश्विनी, रोहणी, मृग, चित्रा, अनुराधा, ह्यांसारख्या नक्षत्रांवर शुभ वारावार, लग्नावर नाव ठेवावे. ते मुलांच्या राशीनुसार आलेले राजवंशातील मोठ्या व्यक्तींपैकी कुणाचे तरी असावे (१५–१७). सहाव्या सातव्या, किंवा आठव्या महिन्यात राजपुत्राचे कान टोचावेत. कान टोचल्याने पुष्टी, आयुष्य, श्री ह्यांची वृद्धी होते. राजपुत्राचा कान सोन्याच्या सुईने टोचावा. ब्राह्मण आणि वैश्य मुलाचे कान चांदीच्या आणि शूद्र मुलाचे कान लोखंडी सुईने टोचावेत (२४). कोणताही मुलगा पुढे कोणता व्यवसाय करील व उपजीविका मिळवील हे कळण्यासाठी पुढील प्रकारे परीक्षा घ्यावी. त्याच्यासमोर सर्व प्रकारच्या धंद्यांची उपकरणे, हत्यारे, वस्त्रे ठेवावीत. त्यातील जो लहान मुलगा स्वतःहून जे हत्यार उचलील त्यावरून त्याचा भावी धंदा ओळखू येतो (२९–३०). पाचव्या महिन्यात मुलाला प्रथम

अनुक्रमणिका

जमिनीवर बसवावे. त्यावेळी वराहपूजा, आणि पृथ्वीदेवीची पूजा करावी. पृथ्वीला उद्देशून, रक्षैनं वसुधे देवी सदा सर्वगतं शुभे । आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये । अचिरादायुषस्तस्य ये केचित् परिपंथिनः । जीवितारोग्य-वित्तेषु निर्दहस्वाचिरेण तान् । कुमारं पाहि मातस्त्वं ब्रह्मा तदनुमन्यताम् । हा बालकाचे रक्षण करण्याची, आयुष्य वाढवण्याची प्रार्थना असलेला मंत्र म्हणून मग बालकाला जमिनीवर बसवावे (३१–३६). राजाने आपल्या मुलाच्या बोबड्या बोलण्याचा उपभोग घ्यावा. लहान मुलाचे अर्धवट बोलणे, त्यांनी रागावून दिलेल्या शिव्या ह्या मनोहर असतात. त्यांचे रांगणे, पडणे, आईचा हात धरून हळु हळु चालणे ह्या गोष्टी राजाने पहाव्यात. त्याला फळे दाखवून आपल्याकडे आकृष्ट करून घ्यावे (४०–४२). रक्षण करणारा मंत्र लिहिलेली आणि लाख लावलेली पाने, वाघाची नखे, कवड्या, बोकडाचे केस, ह्यांनी युक्त अशा माळा मुलाला बांधाव्यात. त्याच्या पायात, कमरेला, सोन्याच्या घंटानी युक्त अशा साखळ्या घालाव्यात. अशा प्रकारच्या आणि आईवडिलांना पाहून इकडे तिकडे धावणाऱ्या मुलाचे सुकुमार अंग राजाने आलिंगावे (४३–४७). पुत्र आपले कान, केस ओढत असता त्याच्या मुखाचे चुंबन घेऊन राजाने सुखी व्हावे. लहान मूल म्हणजे योगींद्र शिवाप्रमाणे दिगंबर, आनंदपूर्ण असणारे, कसाच्या जटा झालेल्या, अंगाला धूळ लागलेली असे असते. अशा प्रकारच्या स्वपुत्राचे दर्शन पुण्यवान लोकानाच होऊ शकते (४९–५०). पाचव्या वर्षी मुलाला अक्षरे शिकवावीत (५४). मग त्याला कला–आचार्यांच्या अधीन करावे. हे आचार्य रागीट नसावेत. ते शास्त्रमर्मज्ञ, अनालस्य, निर्व्यसनी, बोलके, सज्जनांस मान्य, असे असावेत. (५६–५७). आचार्य जी विद्या शिकवणार ती नास्तिक्यहीन असावी. कारण सर्वात मोठे अनिष्ट असे जर काही असेल तर ते म्हणजे नास्तिकपणा. नास्तिक्यदूषित अशा विद्येचा काय उपयोग : त्यापेक्षा मूर्खपणा परवडला (५८–५९). आचार्यांनी विद्या देताना मधुर वाक्यांनी शिष्याला शिकवावे, मारून, बांधून, निगरगट्ट बनवू नये. मारल्यास शहाण्याने डोक्यावर, हृदयावर, मारू नये. शरीराच्या अधोभागावर थोडेसे मारावे. (६०–६२). शिष्य कृतज्ञ स्वच्छ, हुशार, द्रोहहीन, शाठ्यहीन मधुराहारी, कवड्या, वगैरेनी न खेळणारे, करमणूक टाळणारे, विनीत असे असावेत ( ६२–६४ ). अध्ययन संपल्यावर गुरूला दक्षिणा द्यावी. गुरूला ग्राम शहरे ह्यांनी युक्त अशी पृथ्वी दिली तरी त्याच्या ऋणातून मुक्ती होऊ शकत नाही (६६–६७). हे लक्षात ठेवावे. मग उपनयन करून वेद अस्त्रविद्या ह्या गोष्टी राजपुत्राला शिकवाव्यात (६८–३९). राजपुत्राची श्रुती, राजनीती,

स्मृती, काव्य, व्याकरण, धनुर्विद्या, शस्त्रांचा वापर, गजारोहण रथारोहण, अश्वारोहण, स्वरशास्त्र इत्यादी बाबतीत परीक्षा घ्यावी (७०-७८). राजाने आपल्या मुलांचा आपल्याहून अधिक उत्कर्ष इच्छावा. आपणाहून गुणाधिकतर पुत्र पुण्यानेच मिळतात. (७८-७९). अशा प्रकारे उत्तम शिक्षण पूर्ण झालेल्या आपल्या पुत्रांना पाहून आणि त्यांना हत्ती, घोडे, रत्ने दागिने, ह्यांनी संतुष्ट करून राजाने सुखी ठेवावे. (८०-८१). मग राजपुत्राच्या गुरुंना धन, गाव, इत्यादी देऊन सत्कार करावा. नंतर राजपुत्राचा विवाह करावा. (८१-८४). विवाहसमयी कापडी मांडव घालावेत. खांबांना कापडी पट्टे गुंडाळलेले असावेत. जमीन शेणाने सारवलेली असावी. (९१). नांदीश्राद्ध, पुण्याहवाचन करून मुलाला पांढरे कपडे घालून अंगठी घालून वेदीतर न्यावे. त्याला पूर्व दिशेला तोंड करून तांदुळाच्या पुंजावर उभे करावे. कन्येलासुद्धा तांदुळाच्या पुंजावर पश्चिमेला तोंड करून उभे करावे. त्या दोघामध्ये पांढरे वस्त्र धरावे (९२-९२). दोघांच्या हातात जिरे आणि तांदूळ द्यावेत. मुहूर्ताची वेळ झाली की मध्यस्थ पट दूर करावा. मग कुमार आणि कन्या ह्यांनी एकमेकावर जिरे-तांदूळ टाकावेत (९७) विवाहात हुंडा म्हणून पुत्राला व त्याच्या पत्नीला वस्त्रे, रत्ने, सोने, दागिने, घरे, घोडे, म्हशी, दासी, दास द्यावेत (१०५). मंगल वाद्ये वाजवावीत (१०७-१०८). चार दिवस लोकांना अन्नपान व विडे द्यावेत (१०९). चौथ्या दिवशी रस्त्यावर वरयात्रा म्हणजे वरात काढावी. त्यासाठी वधूवरांना नेत्रदीपक अशा प्रकारे सजवावे. अनेक सुशोभित हत्तिणी कुमार आणि त्याचे सेवक ह्यांना बसण्यासाठी आणाव्यात. मग मोठी वाद्ये वाजत असता वरयात्रा निघावी. रस्त्यावर नागरिक स्त्रियांनी वराची पूजा करावी. (११०-११७). अशा प्रकारे राजाने आपल्या पुत्राचा विवाह करून देऊन त्यांना पुनः पुत्र झाले की त्या नातवांना मांडीवर घेऊन खेळवावे. अशा प्रकारे आपल्या पुत्रांचे संगोपन, शिक्षण, विवाह इत्यादी गोष्टी करून राजाने पुत्रोपभोग घ्यावा (११९-१२१)

### पाळीव प्राण्यांचा भोग-

राजाने अनेक प्राणी आपल्या करमणुकीसाठी पाळावेत. त्यातील हत्ती आणि घोडा हे युद्धोपयोगी प्राणी असून त्याच्यासंबंधी गजशास्त्रीय आणि अश्वशास्त्रीय माहिती ह्या आधी सांगितलीच आहे, त्याप्रमाणेच राजाने भुंगा, मोर, हंस चिमणा, कोंबडा, चकोर, सरडा, अस्वल, बोकड, माकड, मांजर बैल हे प्राणी पाळून ते घोड्याच्या तबेल्याजवळ ठेवावेत. म्हणजे घोड्याना दृष्ट

अनुक्रमणिका

लागत नाही. (७.१३.१८८-१८९ ). अशा रीतीने हे करमणुकीचे प्राणी पाळण्यामागे यात्वात्मक असे उद्देश आहेत हे स्पष्ट होईल. कोंबड्याची माहिती सांगताना त्याच्या विविध जाती पुढीलप्रमाणे सांगितल्या आहेत. शंखाप्रमाणे आवाज असणारा, पांढरे पाय, पांढरे डोळे असणारा कोंबडा शंख जातीचा समजावा ( ८.४.५-६ ). मांड्या लहान, पाय पांढरे, मोठी शेपटी ही नार जातीच्या कोंबड्याची लक्षणे आहेत. ( १० ) पिवळे. पाय आणि काळी नखे असणारा कोंबडा गृध्रजातीय असतो ( ११-१२ ). काळ्या रंगाचा, काळ्या पापण्या, लाल डोळे असणारा व युद्धात डोके लांब करणारा कोंबडा सर्प जातीचा (१५) अशा प्रकारच्या विविध जातींच्या कोंबड्यांना तज्ज्ञांकरवी गरम भात, तूप, दही, मिश्र करून पोसावे आणि मग त्यांची युद्धे लावावीत ( १७-१८). एखादा कोंबडा युद्धांत विजयी होईल का नाही ते पुढील प्रकारच्या शकुनांवरून ओळखावे. कोंबडा जर युद्धापूर्वी स्वतःच्या शरीरास उजव्या पायाने स्पर्श करीत असेल, मान आखडून, जीभ दाखवून जांभई देत असेल तर तो विजयी होतो ( १८-२० ). कोंबड्यांची युद्धे अश्विन ते फाल्गुन ह्या दरम्यान करावीत. त्यावेळी त्यांचे पंख सुदृढ असतात ( २४-२५ ). युद्धाआधी कोंबड्यांच्या तुऱ्यांना दिव्याचे काजळ लावावे ( २३ ). युद्धाच्या सुरवातीला कोंबडे प्रथम अेकमेकांकडे पाहतात. डोकी हलवतात मग क्रोधी होऊन चोचीने अेकमेकांवर प्रहार करतात, रक्त ओकतात, रक्तबंबाळ होतात. अशा वेळी मधूनमधून त्यांना दूर करून पाणी पाजावे. वारा घालावा व पुनः युद्धास सोडावे ( २९-३३ ). अेखादा कोंबडा पडला की त्यावर कोंबट पाणी टाकावे, फुंकर घालून त्याला उचलावे पाणी पाजावे ( ३६-३८ ). अशा रीतीने लावकपक्षी, रेडे, हरिणे, हेही प्राणी पाळून त्यांची युद्धे लावावीत. पोपट मात्र नुसते साध्या करमणुकीकरता पाळावेत. त्यांची युद्धे लावू नयेत. ( ६६ ). पोपटांच्या जाती सांगताना पांढरे पोपट ब्राह्मण, तांबडे क्षत्रिय, पिवळे वैश्य आणि हिरवे शूद्र ( ६७ ) आणि पंचरंगी मिश्र जातीचे ( ७१ ) अशा जाती सांगितल्या आहेत. कृश, विस्वर, दीन, विवर्ण, लाकूड मोडणारा असा पोपट पाळू नये. ( ६८ ). राजांनी पोपटांशी बोलावे, खेळावे ( ७२-७३ ) त्यांना मेंढीचे दूध द्यावे म्हणजे त्यांचा आवाज गोड होतो ( ७३ ). राजाने कुत्रे कसे पाळावेत हे सांगताना पुढील प्रकारचा शुभलक्षणी कुत्रा सांगितला आहे- तीन पायांना पाच नखे आणि पुढच्या उजव्या पायाला सहा नखे असणारा, ओठ, नाक तांबूस असणारा, सिंहाप्रमाणे गती असणारा, जमिनीचा

वास घेत चालणारा, शेपटीवर भरपूर केस असणारा, कान लांब आणि मऊ असणारा असा कुत्रा धन्याच्या घरी संपत्ती निर्माण करतो ( ८४ ). राजाने गाय बैल पाळावेत. त्यांची माहिती देण्याच्या निमित्ताने शिवतत्त्वरत्नाकरात गोविद्या आली आहे. विहार करण्यासाठी राजाच्या गाडीला दोन बैल जोडलेले असावेत ( ७.१३.१९८ ). नांगराला किंवा गाडीला जे बैल जोडावयाचे ते मऊ ओठांचे, तांबूस जिभेचे, बुडबुड्यासारख्या डोळ्यांचे, सिंहाप्रमाणे खांदे असलेले, पुढे उंच आणि मागे बुटके, स्थूल, दृढ अशा खुरांचे असे असावेत ( १९९–२०४ ). ज्या बैलांची रांग, शक्ती, ध्वज, पताका ह्यांप्रमाणे शोभते ते बैल पुण्यकारक, तसेच धन, सिद्धी, जय मिळवून देणारे असतात (२०८– २०९). ज्याचा एक कान काळा आहे आणि सर्व शरीर पांढरे आहे असे बैल धान्य व धन ह्यांची वाढ करतात ( २१५ ). उंच पांढरी शेपटी असणारा, स्निग्ध वर्णाचा, तांबूस खुरांचा बैल धन्याला लवकर संपत्ती मिळवून देतो (३१८– २१९). गायी जर दोन झाल्या तर राजाला तो अशुभ शकुन होतो. त्या जर पायांनी जमीन तुडवत असल्या तर राजाला रोग होतो. त्याच्या डोळ्यात अश्रू आले तर मृत्यू घडतो. त्या जर ओरडल्या तर चोरांची भीती असते. (२३७). रात्री जर बैल कारणाशिवाय आणि त्याला काही पीडा होत नसताना ओरडला तर तो शुभशकुन समजावा. त्याला जर माशांनी किंवा कुत्र्यांनी बेजार केले तर पाऊस चांगला पडतो. ( २३८ ). गायीच्या स्तनांना मध, जिरे, जिव्हा ( एक वनस्पति ) ह्यांचा लेप दिला तर गाय खूप दूध देते (२४७). वासरु मेले असता रंगीबेरंगी दगडाला मध लावून तो दगड गायीसमोर ठेवावा म्हणजे तो दगड चाटत गाय खूप दूध देते ( २४८ ). शाकवृक्षाच्या कोळशांची पूड तुपासह गायींना तीन दिवस दिल्यास आणि पाणी न पाजल्यास अतिसार बरा होतो ( २५० ). लाख, कुष्ठ, नख, मांसी, तगर, शेण, घृत ह्यांचा धूप गायीम्हशींना त्यांच्या गोठ्यात दिल्यास तो ज्वरनाशक असतो. (२५२–२५३).

मल्लविनोद

राजाने आपल्या करमणुकीसाठी मल्ल ठेवावेत हे सांगताना शिवतत्त्वरत्नाकरात मल्लविद्या समाविष्ट केली आहे. मल्ल वीस वर्षापर्यंत कनिष्ठ, तीस वर्षापर्यंत प्ररुढ आणि त्यानंतर हीयमान ह्या प्रकारचा असून मग तो कुस्तीस अक्षम ठरतो. ( ८.३.४–५ ). राजाने मल्लाना पोषणासाठी द्रव्य द्यावे. उडीद मांस. दही, दूध घातलेले पीठ, तुपसाखर, तुपात तळलेल्या

कोहळ्याचे चूर्ण आणि साखर अशा पदार्थांनी मल्लांना पुष्ट करावे (८-१०). मल्लांना आणि विशेष करून भविष्णु मल्लांना स्त्रियांचे दर्शन, स्पर्श, संलाप, संगम ह्यापासून दूर ठेवावे (१०-११). मल्लांच्या दर एक दिवसाआड कुस्त्या ठेवाव्यात म्हणजे ते मल्लविद्या विसरत नाहीत (११-१२). मल्लांनी विविध प्रकारचे व्यायाम करावेत. सकाळी उठल्यावर वाळूची पोती फेकण्याचा भारश्रम हा व्यायाम घ्यावा. मग भ्रमणश्रम हा व्यायाम घेण्यासाठी एक कोस लांब फिरण्यास जावे आणि लगेच परत यावे. गळ्याएवढ्या पाण्यात शिरून हाताने पाणी दूर करून जलश्रम घ्यावेत. पक्क्या रोवलेल्या, मऊ, चंदन वगैरे लावलेल्या खांबावर उडी मारून हातांनी, छातीने आणि मांड्यांनी खांब पकडून चढावे. हे झाले स्तंभश्रम. अशा प्रकारचे व्यायाम मल्लांनी घ्यावेत (६०-६४). मल्लांचे पुढीलप्रमाणे प्रकार आहेत. मोठ्या शरीराच्या मल्लाला भारी मल्ल म्हणतात. भरपूर बल असलेला, अस्त्रविद्या जाणणारा तो बलाढ्य मल्ल, एका जागेवर घट्ट राहिल्यावर ज्याला हलवता येत नाही तो स्वस्थाननिरत मल्ल, कुस्तीमध्ये न दमणारा मल्ल तो बहुयोधी मल्ल, दुसऱ्याचे दोष जाणू शकणारा आणि डावपेच ओळखणारा तो दर्शक ह्या प्रकारचा मल्ल, उडी मारून दुसऱ्याची मान पकडणारा तो लग्न, कुस्तीचे नियम पाळणारा तो नियत, असे मल्लांचे अनेक प्रकार आहेत (७०-७६). कुस्त्या लावताना त्या दोन सारख्या प्रकारच्या मल्लांच्या लावाव्यात (७७). कुस्तीनंतर विजेत्या मल्लांना सोने, वस्त्रे, दागिने, गावे, बैल द्यावेत (८५).

**मोक्षमार्ग–**

आतापर्यंत राजाच्या उपभोगाची विविध अंगे आणि त्यांचे वर्णन करण्याच्या निमित्ताने शिवतत्त्वरत्नाकरात आलेली विविध शास्त्रे ह्यांची चर्चा केली. शिवतत्त्वरत्नाकरात तत्त्वज्ञानातील विषयही आले आहेत. सर्व जग दुःखमय आहे असे सांगताना शिवतत्त्वरत्नाकरात पुढील श्लोक आला आहे. दुःखं जन्म जरा दुःखं दुःखं मृत्युः पुनः पुनः । एवंविधस्य जीवस्य सुखस्यानुभवः कुतः ॥ (९.२.६). बालवयात बोलता येत नाही म्हणून दुःख, दात येऊ लागल्यावर पुनः दुःख, मग कान टोचण्याचे दुःख, मग अध्ययनाचे, तारुण्यात कामाग्निपीडेचे, वार्धक्यात जरेचे अशाप्रकारे सतत दुःख आहे (७ व पुढे). म्हणून दुःखमुक्तीसाठी आवश्यक, ह्यामुळे प्रथम पूर्वमीमांसा, न्याय, वैशेषिक, सांख्य, वेदान्त, चार्वाक, बौद्ध, जैन, इत्यादी दर्शनांचा प्रथम शिवतत्त्वरत्नाकरात थोडक्यात आशय दिला आहे. तसेच योगमार्गाचेही विवेचन आले आहे. परंतु

शिवतत्वरत्नाकरावर शैवमताचा प्रभाव असल्यामुळे शैवमत विवेचनावर आणि तदनुषंगिक शिवभक्ती, दीक्षाविधी, विभूतिविधान, रुद्राक्षधारण, जपविधि, शिवपूजाक्रमनिरुपण इत्यादी विषयांचेही विवेचन आहे. अशा प्रकारे मोक्ष ह्या पुरुषार्थासाठी विविध उपाय सांगितले असून मोक्षमार्गावरही धर्माचाच प्रभाव आहे हे दिसून येईल. सर्व संसारदुःखांचा शिव हा प्रतिपक्ष मानला असून ( ९.२.९६ ) त्याची उपासना हाच मोक्षाचा मार्ग मानला गेला आहे.

## दीक्षाविधि

शैव मतात पशु, पाश आणि पति ही तीन मूलतत्वे मानली गेली आहेत. पशु म्हणजे जीव, पाश म्हणजे प्रपंच आणि पति म्हणजे शंकर. शिवदीक्षा घेतल्यामुळे पाशापासून मुक्ती मिळते (९.२.१०७–१०९) दीक्षा घेऊन शास्त्रोक्तचर्या आचरिल्यामुळे मुक्ती मिळते असे दुसरीकडे म्हटले असून मुक्त हे केवलज्ञानशक्ती असलेले असतात असे सांगितले आहे. (दीक्षायुक्त विधानेन सर्वथैवास्थिधारिणः ।९३। शास्त्रोक्तचर्यानिरताः मुक्तिमश्नुवतेखिलाः । ते मुक्ताः केवलं ज्ञानशक्तिमन्तो भवन्ति हि ।। (९.७.९६). दीक्षा शब्दाची व्युत्पती सांगणारा पुढील श्लोक पाहण्याजोगा आहे. दीयते लिंगसंबंधः क्षीयते च मलत्रयम् । दीयते क्षीयते येन सा दीक्षेति निगद्यते । (९.७.५) म्हणजे लिंग देणे आणि मलत्रयाचा क्षय होणे हे दीक्षाविधीचे मुख्य घटक आहेत. दीक्षेचे विविध प्रकार आहेत. आचार्याने परम तत्वावर मन एकाग्र करून, उजव्या हातात शिवलिंग धरून शिष्याच्या मस्तकाला स्पर्श करणे ही स्पर्शदीक्षा ( २८–२९ ). संहितामंत्रांचे उच्चारण शिष्याकडून करवून घेणे ही वाग्दीक्षा. केवळ मनाच्या संनिधानाने केली जाणारी ती मानसी दीक्षा ( ३० ). शस्त्रप्रदान करण्याने होणारी ती शास्त्रदीक्षा, योगामुळे घडणारी ती योगदीक्षा (३१) गुरुच्या आज्ञेचे पालन करणे ही आज्ञादीक्षा ( ३४ ). दीक्षाविधी हा एखाद्या शिवालयाच्या जवळ घडवावा ( ८९ ). प्रथम शिष्याने गुरूची व ब्राह्मणांची पूजा करावी ( ९०–९१ ). दीक्षा व मंत्रग्रहण हे जर महिन्यात केले तर रत्नलाभ होतो. ज्येष्ठ महिन्यात केले तर मृत्यू ओढवतो. श्रावणात केले तर पूर्णायुष्याची प्राप्ती होते (११५–११६). अशा प्रकारे विविध फले आहेत. दीक्षेसाठी जेथे मांडव घालावयाचा ती जमीन प्रथम पंचगव्याने शिंपडून घ्यावी. मग पुण्याहवाचन करून मांडव घालावा ( ९.८.५–६ ) वेदी तयार करून चार दिशांना चार व मध्ये एक असे कलश ठेवावेत. ते ठेवताना ओंकारासह अनुक्रमे ह्रां, ह्रीं ह्रूं ह्रें ह्रैं ह्या बीजाक्षरांचा उच्चार करावा (१८–२३). त्या कलशा-

मध्ये आम्रपल्लव, दूर्वांकुर, विड्याची पाने, रत्ने ठेवावीत (२६–२८). कलशांमध्ये काही वेळ शिवलिंग ठेवावे (३४). गुरूने आपले मन शंकरावर एकाग्र करून पूर्व दिशेला तोंड करून बसावे (४१). शुद्धिमंत्र म्हणून गुरूने मग ऋत्विजासह शिष्याच्या मस्तकावर दूर्वा व पल्लवांकुर ह्यांनी कलशातील पाण्याचा अभिषेक करावा (४२–४८). मग गुरूने शिष्याला मूलपंचाक्षरी मंत्र म्हणून शिवलिंग द्यावे (६९). हे लिंग आपले जवळ शिष्याने नेहमी धारण केले पाहिजे (७१). नंतर गुरूने शिष्याच्या कानात मूलमंत्राचा उपदेश करावा (७३).

भस्मधारण विधि

प्रथम स्नान करून, धुतलेली वस्त्रे परिधान करून, भस्माचा त्रिपुंड्र धारण करून आणि रुद्राक्षमालिका धारण करून शिवाजी पूजा करावयाची असते (८.५.२५–२६). त्यातील भस्मधारणविधीचे वर्णन करताना प्रथम भस्माचे पाच प्रकार सांगितले आहेत. पहिल्या प्रकाराला विभूती म्हणतात. कारण त्यामुळे ऐश्वर्यप्राप्ती होते. दुसऱ्याला भस्म म्हणतात कारण ते सर्व पापाचे भक्षण करते, तिसऱ्याला भसित म्हणतात कारण ते भासनयुक्त असते, चौथ्याला क्षार म्हणतात कारण ते संकटांचे क्षारण करते, आणि पाचव्याला रक्षा म्हणतात कारण ते चोर, वाघ इत्यादींपासून रक्षण करते (२८–३०). नित्यकार्यात विभूती, नैमित्तिक कार्यात भसित रक्षाविधींमध्ये रक्षा, प्रायश्चित्तविधीत भस्म आणि मोक्ष कार्यात क्षार धारण करावे. कार्तिक, मार्गशीर्ष, माघ, आश्विन, वैशाख किंवा श्रावण ह्या महिन्यात भस्म गोळा करून ठेवावे (३६–३७). शुद्ध भस्माने स्नान केल्यामुळे भुक्ती आणि मुक्ती मिळते (३७). कपिला, अग्निवर्णा किंवा सोनेरी रंगाच्या गायीला आदल्या दिवशी कोमल गवताचे अंकुर तिची स्तुती करून तिला नमस्कार करून खाण्यास द्यावेत (३९–४०). मग रात्री धूपदीपांनी तिची पूजा करावी (४४). रात्री जागरण करावे व सकाळी तिचे शेण जमिनीवर पडण्याच्या आत उचलावे (४६–४७). ते शेण मग उन्हात वाळवावे (४८). मग अग्नी प्रदीप्त करून त्यात शिवाला आवाहन करावे आणि रुद्रसूक्ताने शिवासाठी होम करावा व त्यात गोमयपिंड टाकावा (४९–५०) व भस्म तयार करावे. भस्माने स्नान केल्याने सर्व पापे नष्ट होतात (६७). ओं नमः शिवाय ह्या पंचाक्षरी मंत्राने भस्म सातवेळा अभिमंत्रित करून भस्माचा त्रिपुंड्र लावावा, तसेच कान, डोळे, नाक, आस्य, ग्रीवा, स्कंध, बाहू इत्यादींवर भस्म लावावे (७०–७५). ब्राह्मणांनी सहा बोटे

लांब, क्षत्रियांनी चार, वैश्यांनी दोन आणि शूद्रांनी एक बोट लांब भस्म लावावे (९४–९५). भस्मधारणविधि हा मोक्षाचा उपाय मानला आहे (७६). जे भस्म धारण करणार नाहीत ते कोटी जन्म झाले तरी संसारातून मुक्त होणार नाहीत (७८) म्हणून मोक्षाची इच्छा करणाऱ्याने अनवधानानेसुद्धा भस्म धारण करणे सोडू नये (७९). भस्मधारणाने ब्रह्मप्राप्ती होते असेही म्हटले गेले आहे.

रुद्राक्षधारणजपविधि–

ब्राह्मणांनी पांढरे रुद्राक्ष, क्षत्रियांनी तांबडे, वैश्यांनी पिवळे आणि शूद्रांनी काळे रुद्राक्ष धारण करावेत (८.६.११–१२) किडयांनी भक्षिलेले, मोडलेले, काटे नसलेले असे टाळावेत (१४). एकमुखी रुद्राक्ष हे परतत्वाचे स्वरूप आहे, तो धारण करणारा परतत्वात विलीन होतो. दोनमुखी रुद्राक्ष धारण केल्याने शंकर प्रसन्न होतो. तीनमुखी रुद्राक्षाच्या धारणाने स्त्रीहत्येचे पाप दूर होते. चतुर्मुखी रुद्राक्ष धारणाने नरहत्येचे पाप दूर होते. (२०–२२). अशा प्रकारे रुद्राक्ष धारणाचे यातुधर्मात्मक उपयोग आहेत. तसे मोक्षप्राप्ती हाही त्याचा एक उपयोग आहे. शिवतत्वरत्नाकरात प्रतिबिंबित झालेले मोक्षशास्त्रही यातुधर्मात्मक आहे हे येथे लक्षात येईल. जप करताना तो घरात, गोठ्यात, नदीतीरी, किंवा पुण्याश्रमात करावा (३४). मंत्र हळुहळु उच्चारावा. ओठ किंचित हलवावेत (४०). अक्षरे जर फार ऱ्हस्व उच्चारली तर व्याधीचे भय असते, अतिदीर्घ उच्चारल्यास तप नष्ट होते (४३). म्हणून मध्यम गतीत मंत्र जपला पाहिजे. जपामुळे यक्ष राक्षसांचा नाश होतो (४८). जपामुळे रोग, मृत्यु, नष्ट होतात (४९) मध्यमा, अनामिका आणि अंगठा ह्या बोटांनी मण्यांना स्पर्श करावा (६७). अंगठ्याच्या स्पर्शामुळे मोक्ष, मध्यमेमुळे धन आणि अनामिकेमुळे शांती मिळते (६८). जपामुळे देवता प्रसन्न होऊन भोग आणि मोक्ष देतात (४६). जपमालेचे मणी एकमेकांना चिकटलेले नसावेत. दोन मण्यात गाठ असावी. माळेचे मणी एकमेकावर घासले तर जपाचा नाश होतो (५९).

शिवध्यान–

शिवाचे ध्यान करताना प्रथम सगुणध्यान करावे आणि मग निर्गुणध्यान करावे (८.६.८२). ध्यानासाठी निवडलेल्या आसनांना अनेक शुभाशुभ फले असतात. ध्यान जमिनीवर बसून केल्यास सुखप्राप्ती होते, लाकडी आसन घेतल्यास दौर्भाग्य, तृणासन घेतल्यास यशोहानी, पानांचे आसन घेतल्यास चित्तविभ्रम, वस्त्राचे आसन केल्यास दारिद्र्य, पाषाणाचे आसन केल्यास

अनुक्रमणिका

व्याधी, दर्भाचे केल्यास तपोवृद्धी, रत्नाचे केल्यास प्रजावृद्धी, कंबलाचे केल्यास सर्वकामप्राप्ती, कृष्णाजिनाचे केल्यास ज्ञानप्राप्ती, व्याघ्रचर्माचे केल्यास मोक्ष अशी फले आहेत. ध्यान अभिचारविधीसाठी असल्यास आसन तांबड्या रंगाचे असावे (८९–९२).

शिवपूजाविधी–

शिवपूजन हे स्वर्ग आणि मोक्ष दोन्हींचेही साधन मानले आहे (८.७.४). सर्व देवसुद्धा शिवलिंगाची पूजा करत असतात. विष्णू इंद्रनीलमय लिंगाची पूजा करतो व त्यामुळे त्याला विष्णुत्व प्राप्त होते. त्याचप्रमाणे ब्रह्मा शिलामय, शक्र मणिमय, अग्नि अन्नमय, वरुण स्फटिकाच्या इत्यादीप्रमाणे विविध देव विविध प्रकारच्या लिंगांची पूजा करून आपापले देवत्व मिळवत असतात. (६–१०). शिवलिंगपूजेची इतर फळे म्हणजे राज्य, विद्या, धन, रूप, निरोगीपणा, वैराग्य, इत्यादी (२४–२५). पूजेसाठी चंदन, बिल्व, फुले, फळे ही ही वापरल्याने शिवाची प्रसन्नता निर्माण होते (३५–३६). कमीत कमी स्नान, पूजा, नैवेद्य हे उपचार करावेत (४३). परंतु त्यापेक्षा अधिक उपचार केल्यास अधिक चांगले. उदाहरणार्थ प्रदक्षिणा, नमस्कार, संगीत, भूषणे, अनुलेपने, वस्त्रे, धूप, दीप, तांबूल, पुराणपठन, छत्र, चामर इत्यादी अनेक उपचार शिवपूजनात समाविष्ट असावेत (४३–५४).

शिवाची मानसपूजा :

मनातल्या मनात भक्ताने अंतर्गत, चिराकार, शिवमयलिंगाची पूजा करावी (७२). त्या पूजेत बोध हाच दीप, क्षमा हेच अभिषेकाचे पाणी, विवेक हेच वस्त्र, सत्य हेच दागिने, वैराग्य म्हणजे फुलांच्या माळा, शम आदी गुण म्हणजेच गंध, निरहंकारपणा म्हणजेच अक्षता, श्रद्धा म्हणजेच धूप, मौन म्हणजेच घंटा अशा प्रकारचे उपचार आहेत (७३–७७).

शिवभक्तांची पूजा :

शिवाच्या पूजेसारखीच शिवभक्ताची पूजा हे माणसाचे कर्तव्य आहे. शिवभक्ताची पूजा हीही स्वर्ग, आणि मोक्ष ह्यांचे कारण आहे. अतिथि म्हणून येणाऱ्या शिवभक्ताची अभ्युत्थान, अभिगमन, स्वागत, आसन, प्रियवाक्य, पादोदक, अनुव्रज्या ह्या गोष्टींनी पूजा करणे हा जणू स्वर्गाचा सोपानच आहे. (८.८,३६–३७). जो शिवभक्ताची आसन, अभ्यंजन, स्नान, वस्त्र, धान्य, अंगना इत्यादी गोष्टी देऊन पूजा करतो तो परमगतीस प्राप्त होतो (३७–३८).

शिवभक्ताच्या दर्शनाने ब्रह्महत्यादी पाप नष्ट होते ( ३८–३९ ). शिवभक्ताला केवळ मनुष्य समजणे हे शिवलिंगाला केवळ पाषाण समजण्यासारखेच मोठे पाप आहे (४५). शिवाची दोन लिंगे आहेत, एक स्थावर आणि दुसरे जंगम. जंगमाचा अपमान केल्यास स्थावर निष्फळ होते (४६). शिवयोग्याच्या शरीरात शिव असतो. म्हणून त्याच्या पूजेने शिव पूजित होतो (४९). शिवभक्ताच्या पायाच्या धुळीच्या स्पर्शाने मुक्ति मिळते ( ५३ ). शिवभक्ताला वस्त्र दिल्याने ब्रह्मपदप्राप्ती होते (५६). धन दिल्याने धनेशत्व प्राप्त होते (५९). फल मूल दिल्याने परमागती लाभते (६३). शिव हा नित्य तृप्त आहे, त्याच्यासाठी माणसे काय करू शकणार आहेत ? पण शिवभक्तांसाठी काही तरी केल्यानेच शिव नित्यतृप्त होतो ( ७२ ). शिवभक्ताची पूजा ही संसारसागर तरून जाण्याची नौका आहे (७४). अशा रीतीने मोक्षाचेही साधन कर्मकांडच आहे म्हणजे धर्मच आहे.

### योगशास्त्र

मोक्षप्राप्तीचा एक मार्ग म्हणजे योगमार्ग. त्याचेही शिवतत्त्वरत्नाकरात वर्णन असून तेही यातुधर्मात्मक दृष्टया महत्वाचे आहे. योगाचे मंत्रयोग, लययोग, हठयोग, राजयोग आणि शैवयोग असे प्रकार आहेत. ओम् ह्या एकाक्षरी किंवा हंस ह्या द्व्यक्षरी इत्यादी प्रकारच्या मंत्राचा जप करावा (७.१५.४–६) लययोगामध्ये मंत्रासह मनाचा ध्येयवस्तूत किंवा घंटा, झांजा, शंख, वीणा, वेणु इत्यादींच्या नादात लय करणे ( ७–८ ). त्यानेही क्रमाक्रमाने स्थूल नादाकडून सूक्ष्म नादाकडे जावे (९). हठयोगाला अष्टांगयोग म्हणतात आणि त्यात यम–नियम इत्यादींचे पालन करावे लागते (१०). यमामध्ये अहिंसा, सत्य, अस्तेय, मितभोजन, क्षमा दया इत्यादींचा समावेश आहे (१२). नियमामध्ये तुष्टी, श्रद्धा, मती शिवपूजा, जप, तप, विराम, लज्जा, भस्मावगुण्ठन, योग, श्रुती, ह्यांचा समावेश आहे (१३). आसने चौऱ्यांशी आहेत. त्यापैकी स्वस्तिकासन करताना गुडघे, मांडया ह्यांच्यामध्ये तळपाय ठेवून सरळ बसावयाचे असते, (२१–२२). पद्मासनात डाव्या हाताने उजव्या पायाचा अंगठा धरावा. तळपाय मांडीवर येऊ द्यावेत (२६). अशा प्रकारे आसनाच्यायोगे कुंडलिनी जागृत केल्यावर अनेक सिद्धी मिळतात. उदाहरणार्थ वपुःपटुत्व, मुखप्रसाद, नादस्फुटत्व, डोळयाची स्वच्छता. कामाग्निदीप्तता, बिंदुविजय नाडीची शुद्धी, निरोगीपणा इत्यादी. ( ४६–४७ ). प्राणायामाचे वर्णन करताना त्याचे रेचक, पूरक, कुंभक असे तीन घटक सांगितले आहेत. प्राणायामाच्या

वेळी "स शिवोहम्" असा जप करावा (७२-७४). योग्यांच्या मठाची रचना करताना मठाला दारे कमी ठेवावीत. तो कडेने बंदिस्त असावा. त्या आसपास कोणतीही विघ्ने नसावीत. मठामध्ये कुश, अजिन, भस्म, असावे. योग्याने गहू, तांदूळ, तूप, दूध, साखर, मध, मूग, पालेभाज्या, नदीचे पाणी, सुंठ हे पदार्थ खावेत. उष्ण, रुक्ष, कटु, आम्ल, हिंग, लसूण, तीळ हे पदार्थ वर्ज्य करावेत. हितकारक, परिमित, स्निग्ध, मधुर, मऊ, किंचित उष्ण, असे पदार्थ खावेत. योग्याने अति आहार, नियमरहितपणा, बडबड, लोकसमुदाय, लौल्य ह्या गोष्टी वर्ज्य कराव्यात. कारण त्यामुळे योग नष्ट होतो. उत्साह, स्थैर्य, धैर्य, यथालाभसंतोष, तत्वज्ञान, लोकसंगाचा त्याग ह्यांमुळे योग वाढतो. (६७-७०). अशाप्रकारे ही हठयोगाची माहिती झाली. आता राजयोग म्हणजे समाधी लावणे, पाण्यात पाणी तसा स्वात्मा परमात्म्यात म्हणजे समाधी म्हणजेच राजयोग (८४). समाधी परपद. अमनस्क, अद्वैत, जीवनमुक्ती, तुर्यावस्था हे सर्व शब्द पर्याय आहेत (८५-८६) जालंधरबंधात गळा आकुंचित करून त्यावर हनुवटी चिकटवावी. त्यामुळे वृद्धत्व, मरण नष्ट होते (९२). गालाच्या खड्यात जीभ उलटी ठेवून दृष्टी भुवयांमध्ये ठेवणे ही खेचरी मुद्रा योग्यांनी करावी (९७). गूढ भाषेत असे सांगितले आहे की योग्यांनी गोमांस खावे व अमर वारुणी प्यावी. ह्याचा गूढ अर्थ असा की गो म्हणजे जीभ, ती उलटी लोटावी म्हणजे गोमांस भक्षण करावे. जिभेपासून सुटणारा रस हीच अमर वारुणी ती योग्यांनी प्यावी (१००-१०१). योग्याने धार्मिक लोकांशी मैत्रीने वागावे, पापी लोकांशी उपेक्षेने वागावे. दुःखी लोकांशी दयेने वागावे दुष्ट लोकांशी तुष्टीने वागावे (११३). ही राजयोगाची माहिती झाली. आता शिवयोग म्हणजे पूर्णचंद्राच्या बिंबाप्रमाणे रत्नाप्रमाणे, मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणे किंवा विजेच्या कांतीप्रमाणे असे शिवलिंग अंतश्चक्षूंनी पहाणे (१५७). पूजा करताना अहिंसा, इंद्रियनिग्रह, ज्ञान, ध्यान, तप, सत्य ह्या पुष्पांच्या योगे स्वतःच्या ठिकाणी सिद्धलिंगपूजा करावी (१५९). कुठलाही विषय न चिंतणे म्हणजेच शिवचिंतन, निष्क्रियता म्हणजेच शिवपूजन, निश्चलत्व म्हणजेच प्रदक्षिणा, सोहंभाव म्हणजेच नमस्कार, मौन म्हणजेच नामसंकीर्तन (१६७-६८). अशा रीतीने योगी झाल्यावर त्याने सहजावस्थेत रहावे, सर्वेंद्रियगुणरहित, रूपातीत, निरंजन, शांत असे असावे (१६९).

## उपसंहार

अशा रीतीने आतापर्यंत शिवतत्वरत्नाकरातील महत्वाच्या विषयांचा परामर्श मी घेतला. हा परामर्श घेताना शिवतत्वरत्नाकराचे धर्मेतिहासाच्या

दृष्टीने महत्व लक्षात आणून देण्याचा प्रयत्न केला आहे. शिवतत्वरत्नाकर हा एक तत्कालीन संदर्भातील विश्वकोश आहे. जास्तीत जास्त विषय जास्तीत जास्त तपशीलाने समाविष्ट करण्याचा शिवतत्वरत्नाकराच्या संपादकाचा प्रयत्न स्पष्ट आहे. आता हा विश्वकोष म्हणजे एक ज्ञानकोष आहे असे वरवर पाहता वाटेल. तसेच प्राचीन भारतातील विविध शास्त्रांची ह्यां ग्रंथात माहिती मिळेल असेही वाटण्याची शक्यता आहे. परंतु ती कल्पना योग्य होणार नाही. शिव-तत्वरत्नाकरात काय किंवा इतरही अशा प्रकारच्या संकलनात्मक किंवा विशिष्ट विषयांवर लिहिल्या गेलेल्या प्राचीन भारतीय ग्रंथात आपणांस प्राधान्य दिसते ते धर्माचे. प्राचीन विचारसरणीत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ मानले गेले आहेत. त्या चारींवर सारखाच भर आहे असे जरी प्रथमदर्शनी वाटले तरी मला असे वाटते की धर्म हाच त्या चारींमध्ये केवळ महत्त्वाचा मानला जात होता एवढेच नव्हे तर धर्माने अर्थ काम आणि मोक्ष ह्या इतर पुरुषार्थांवर आक्रमण करून त्यांना दुय्यम बनविले आहे. अर्थ, काम आणि मोक्ष ह्याविषयींच्या विचारातही आपणास म्हणूनच धार्मिक विचारांचे प्राबल्य दिसते. दिसते. त्यामुळे प्रत्येक ठिकाणी आपणास देवतांची पूजा-अर्चा ब्राह्मण-भोजन, दक्षिणा, विधिनिषेध, ह्यांचेच प्राबल्य दिसून येते. प्राचीन भारतातील तथाकथित प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र ह्यामध्ये कित्येक लोकभ्रम, चालीरीती, वर्ज्यावर्ज्यता, कर्मकांडे दिसतील. पशु किंवा वृक्ष हे त्यांच्या यातुधर्मात्मक वैशिष्ट्यांविरहित असे कधी विचारात घेतले जात नसत. तसेच रत्ने, धातू, ह्यांच्या विषयींच्या शास्त्रांमध्ये त्या त्या रत्नांचे, धातूंचे शास्त्रीय गुणधर्म काय ह्यापेक्षा यातुधर्मात्मक गुणधर्म कोणते ह्याविषयी प्राचीन भारतीयांना जास्त अभिरुची होती. त्यामुळे शिवतत्वरत्नाकराचे महत्त्व प्राचीन भारतीय शास्त्रांच्या किंवा विज्ञानाच्या दृष्टिकोनातून आहे असे मला वाटते. शिवतत्त्व-रत्नाकरात आलेले राज्यशास्त्र, कोर्टाच्या कामाबद्दलचे म्हणजे व्यवहारशास्त्र इत्यादी विषयही यातुधर्मात्मक कल्पनांनी भरलेले आहेत. आणि त्यांचे महत्त्व धार्मिक दृष्टिकोनातूनच आहे. अशा रीतीने अर्थ ह्या पुरुषार्थाची माहिती, जशी इतर प्राचीन भारतीय ग्रंथात तशी शिवतत्वरत्नाकरामध्येही यातुधर्मात्मकच आहे. जी स्थिती अर्थ ह्या पुरुषार्थाची तीच काम ह्या पुरुषार्थाबाबत. शिवतत्वरत्ना-करातील कामशास्त्रीय माहितीही यातुधर्मात्मकच आहे. त्यातील वशीकरणाच्या युक्त्या ह्या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत. शिवतत्त्वरत्नाकरातील कलांच्या वर्णनातही यातुधर्मात्मकता आहे. चित्रकार गायक हे कसे असावेत, नसावेत;

त्याने आपल्या कलाविष्काराच्या वेळी कोणत्या दिशेला तोंड करावे, कुणाला नमस्कार करावा ह्यासारखे कर्मकांड ह्या कलांच्या वर्णनात आहे. अशारीतीने कलांचाही आधार सौंदर्यशास्त्र हा नसून धर्मशास्त्र आहे. अशा रीतीने काम ह्या पुरुषार्थाची माहितीही धर्मशास्त्राच्या इतिहासातूनच महत्त्वाची आहे. तीच स्थिति मोक्ष ह्या पुरुषार्थाबाबत. शिवपूजन, शिवभक्तांचे पूजन, रुद्राक्षधारण, योग ह्यांसारखे यातुधर्मात्मक मार्ग मोक्षाचे साधन म्हणून वर्णिले आहेत. आता धर्म ह्या पुरुषार्थाचे स्वरूप धार्मिक असेल हे सांगावयास नकोच. अशा रीतीने केवळ शिवतत्त्वरत्नाकरातच नव्हे तर सर्वच प्राचीन भारतीय साहित्यात चारी पुरुषार्थांवर धर्माचाच प्रभाव आहे. शिवतत्त्वरत्नाकर हा धर्म, अर्थ, काम, मोक्ष ह्या चारींबाबतीतील विविध प्रकारचे लोकभ्रम, आचार, दैवतशास्त्रीय माहिती, विधिनिषेध ह्यांनी परिपूर्ण असा ग्रंथ असल्यामुळे 'अभिलषितार्थचिन्तामणि' ह्यांसारख्या अितर विश्वकोषांसह तोही अेक ज्ञानकोश नसून धर्मकोश आहे, असे मला वाटते.

( शिवतत्त्वरत्नाकर ह्या विषयावर दि. १८ व १९ ऑक्टो. १९७३ रोजी अिचलकरंजीकर स्मारक व्याख्यानमालेत वाचलेली ही दोन व्याख्याने आहेत. ह्या व्याख्यानांसाठी माझी निवड करण्याबद्दल भारत इतिहास संशोधक मंडळाचे कार्यवाह डॉ. अ. रा. कुलकर्णी, व प्रस्तुत विषय घेण्यास प्रोत्साहन दिल्याबद्दल प्रा. ग. ह. खरे ह्यांस धन्यवाद. शिवतत्त्वरत्नाकराच्या अद्यापी प्रसिद्ध न झालेल्या तिसऱ्या भागाच्या संशोधित आवृत्तीची मुद्रणप्रत अभ्यासण्यास दिल्याबद्दल ओरिअेंटल रिसर्च अिन्स्टिटयुट, म्हैसूर, चे संचालक डॉ. मरुल सिद्धैय्या, तिसऱ्या भागाचे संपादक श्री. मरिबसवाराध्य ह्यांचेही आभार मानतो. )



श्री. व. भ. कर्णिक

# महाराष्ट्राचे विचारधन

सुविख्यात साहित्यिक, पत्रपंडित व विचारवंत श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यानी कोल्हापूरचे शिवाजी विद्यापीठ व आकाशवाणीचे नागपूर केंद्र यांच्या मार्फतीने १९७१ व १९७२ साली दिलेली व्याख्याने या पुस्तकात[१] संग्रहीत केली आहेत. व्याख्याने केवळ त्या त्या ठिकाणच्या श्रोत्यासाठी नव्हती. अनेक वर्षांच्या विचारमंथनानंतर परिपक्व झालेले विचार श्री. माडखोलकर यानी त्या व्याख्यानात ग्रंथित केलेले आहेत. म्हणूनच ती व्याख्याने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आणि तेच त्यांचे महत्त्व आहे.

व्याख्यानांचे दोन भाग करण्यात आलेले आहेत. पहिल्या भागात संत कवींच्या वाङ्मयाचे व शिकवणुकीचे विवेचन असून त्याला "महाराष्ट्राचे संचित' असे नाव देण्यात आले आहे. "आधुनिक महाराष्ट्राचा वारसा" असे दुसऱ्या भागाचे नांव असून त्यामध्ये पेशवाईनंतरच्या एकोणिसाव्या शतकातील व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील महाराष्ट्रातील उक्तीने वा कृतीने समाजाला मार्गदर्शन करणाऱ्या काही थोर व्यक्तींच्या विचारांचे व कृतींचे समालोचन आहे.

महाराष्ट्राच्या विचारधनाबद्दल अधिकारवाणीने बोलण्याची व लिहिण्याची श्री. माडखोलकर यांची पात्रता कुणालाही नाकारता येणार नाही. प्राचीन व अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा त्यांच्याइतका खोल व विवेचक अभ्यास फारच थोडया जणानी केलेला असेल, पिंड जरी साहित्यिकाचा, तरी पत्रपंडित म्हणून त्यांचा राजकारणाशी व समाजकारणाशी दीर्घ आणि दाट परिचय आहे. दोन्ही क्षेत्रामध्ये त्यानी प्रत्यक्ष कार्य केले असून ते सरीव स्वरूपाचे आहे. इतिहास, तत्वज्ञान, धर्मशास्त्र इत्यादि विषयांचा त्यांचा व्यासंग दांडगा असून, त्या व्यासंगाचे फळ नेहमीच त्यांच्या लेखनात व भाषणात दृष्टीस पडते. प्रस्तुत पुस्तक हेदेखील त्यांच्या गाढ व्यासंगाचे व सखोल चिंतनाचे फळ आहे. पुस्तकाच्या पाना-पानावर लेखकाच्या विद्वत्तेची, तत्त्वचिंतनाची व

---

१ 'महाराष्ट्राचे विचारधन' ग. त्र्यं. माडखोलकर विजय प्रकाशन, सीताबर्डी नागपूर ( १९७३ ) किं. रु. १५

प्रतिभेची साक्ष सापडते. वाचक तिच्यामुळे दिपून जातो; आणि भाषाही अशी आहे की कुणालाही भुरळ पडावी. पुस्तकाच्या या गुणामुळेच त्याच्याकडे जरा चिकित्सक बुद्धीने पाहणे जरूरीचे झाले आहे.

कितीही चिकित्सक बुद्धीने पाहिले, तरी पुस्तकातील ज्ञानेश्वरांच्या काळापासून ते विसाव्या शतकाच्या मध्यापर्यंतच्या महाराष्ट्राच्या वैचारिक इतिहासाचे धावते समालोचन डोळ्यात भरल्यावाचून रहात नाही. तसेच विचारधनाच्या निर्मात्यांचे त्रोटक जीवनवृत्तांत. हे वृत्तांत विवेचनाच्या ओघात चपखल बसले असून त्यानी त्या त्या व्यक्तीचे चांगले दर्शन घडते. ज्ञानेश्वरांपासून छत्रपती शाहूमहाराज व डॉ. आंबेडकर यांच्यापर्यंत सर्व विचारश्रेष्ठांच्या जीवनाची संक्षिप्त वर्णने फार वाचनीय झाली आहेत. त्या वर्णनामुळे त्यांचे विचार समजायला चांगली मदत होते.

पुस्तकामध्ये विचारधनाचे बहुश: वर्णन आहे, त्याची चिकित्सा व मूल्यमापन नाही हा एक मोठा दोष आहे "संचिता" च्या बाबतीत थोडेबहुत तरी अप्रत्यक्ष मूल्यमापन आहे; "वारसा" च्या बाबतीत ते क्वचितच दृष्टीस पडते. श्री. माडखोलकरांसारख्या श्रेष्ठ विचारवंताकडून मूल्यमापन अपेक्षित होते. केवळ वर्णन नव्हे. मूल्यमापनामुळे "संचित" व "वारसा" यांच्यापैकी कोणचे आणि का टाकावे अगर स्वीकारावे त्याचा आधुनिक महाराष्ट्राला बोध झाला असता. मूल्यमापनामध्ये मतभेद जरूर येतात. पण त्या विचार-संघर्षामुळेच नवीन मूल्ये प्रतीत होतात आणि समाजाच्या उत्थापनाला मदत होते. श्री. माडखोलकरांनी हे कार्य टाळले हे योग्य झाले नाही.

"संचिता" च्या बाबतीत श्री. माडखोलकर यांनी न्यायमूर्ती रानडे यांचा कित्ता गिरवला आहे. आणि तोदेखील कोणताही नवीन पुरावा न देता. न्यायमूर्तींनी आपला अभिप्राय व्यक्त केला तो जवळ जवळ शंभर वर्षांपूर्वी. त्यानंतर या विषयाची कितीतरी साधक बाधक चर्चा झाली आहे, त्या चर्चेचा परामर्श घेऊन व आपल्या मताला पोषक असे पुरावे देऊन श्री. माडखोलकरांनी मत व्यक्त केले असते तर ते अधिक ग्राह्य ठरले असते. त्याऐवजी दृष्टीस पडते ते एक ठोकळ विधान: "बाराव्या शतकात त्यांनी जी ही क्रांती (समतेच्या पवित्र नात्याच्या पायावर भक्तिपंथाची उभारणी) घडवून आणली, तिचे स्वरूप कितीही मर्यादित असले, तरी तिच्यामुळे सतराव्या शतकातील राजकीय क्रांतीचा मार्ग सुकर झाला, हे निश्चित." (महाराष्ट्राचे संचित, पान ५६) आध्यात्मिक क्षेत्रातील समता आणि स्वराज्याचा उपक्रम यांच्यातील कार्यकारणभाव, निदानीला संबंध, श्री. माडखोलकरानी स्पष्ट करून दाख-

वायला हवा होता. अध्यात्म क्षेत्रातील समता समाजव्यवहारातही पसरली नाही. हे त्यानी स्वतःच दाखवून दिल्यानंतर तर त्यांच्यावरची ही जबाबदारी अधिकच वाढते. न्या. रानडे यांच्याबरोबरीने आपल्या समर्थनार्थ श्री. माडखोलकर यानी पान ५८ वर डॉ. आंबेडकर यांचे एक वाक्य दिले आहे. त्याने त्यांच्या विधानाला पुष्टी लाभत नाही. कारण प्रश्न माणसाचे नैतिक सामर्थ्य वाढविण्याचा नसून शिवकालात स्वराज्यस्थापनेच्या उपक्रमाला संतांच्या शिकवणुकीचा कितपत उपयोग झाला हा आहे.

कांही बाबतीत श्री. माडखोलकर न्या. रानडे यांच्याही पुढे गेले आहेत. एके ठिकाणी ते लिहितात : "वैष्णववीर यानी जसा कलिकालाशी सामना दिला, तसाच इस्लामच्या धार्मिक आक्रमणाशीही" (पान ५३) न्या. रानडे यांचा अभिप्राय वेगळा आहे. पुस्तकामध्ये उद्‌धृत केलेल्या उताऱ्यातील अभिप्राय आहे तो असा : "(ज्ञानेश्वरापासून सुरू झालेल्या धार्मिक चळवळीने) मुस्लिम समाजाशी जुळते घेण्याची योजना अंशतः अमलात आणली." इतिहास पाहिला तर हा अभिप्राय योग्य वाटतो. धार्मिक चळवळीने सुरू केलेली योजना अखेर पूर्णत्वास गेली नाही हे खरे. पण महाराष्ट्रामध्ये मुस्लिम समाजाशी आध्यात्मिक व राजकीय क्षेत्रात मिळते घेण्याचे प्रयत्न सतराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू होते. म्हणून एका बाजूला सर्व मराठे आणि दुसऱ्या बाजूला सर्व मुसलमान असा सामना कधी झाला नाही व सर्वसाधारण जनतेला आणि अनेक मराठा सरदाराना निजामशाही, आदिलशाही अगर कुतुबशाही परक्या मुसलमानांचे राज्य आहे असे वाटले नाही. हे ऐतिहासिक सत्य मान्य केल्याखेरीज शिव छत्रपतीना देखील अनेक मराठा सरदारांचा जो विरोध झाला त्याची संगती लागत नाही. एकोणिसाव्या किंवा विसाव्या शतकातील देश, देशाभिमान वगैरे कल्पना तेराव्या ते सतराव्या शतकातील जनतेवर, संत कवीवर वा राजकारणी पुरुषावर लादणे योग्य नाही. श्री माडखोलकरासारखा विचक्षण इतिहासज्ञ या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करणार नाही असे वाटले होते.

महाराष्ट्रातील लोकमान्य परंपरेप्रमाणे श्री. माडखोलकरानी समर्थ रामदासाना प्रवृत्तीपर देशभक्त संत म्हणून वेगळे काढले आहे या विषयावरही खूप चर्चा झालेली आहे. तिचा परामर्श घेऊन आपले विधान सिद्ध करणे हे लेखकाचे कर्तव्य होते. काळाच्या मर्यादेमुळे व्याख्यानामध्ये ते शक्य नव्हते हे समजू शकते. पण पुस्तक रूपाने ते प्रसिद्ध करताना ही उणीव दूर करता आली असती. चातुर्वर्ण्याच्या समर्थनाच्या बाबतीत रामदासाना इतर संतांच्या मालिकेत बसवणे योग्य नाही. रामदासांचे चातुर्वर्ण्याचे समर्थन खूपच

अधिक आग्रही होते व ते ब्राह्मण्याचेही कडवे पुरस्कर्ते होते. हा भेद लक्षात घेणे जरूरीचे होते.

संत वाङ्मयातील काही " प्रबळ दोष " पुस्तकामध्ये फार चांगल्या रीतीने दाखवण्यात आले आहेत. " नरदेह-निंदा, स्त्रीनिंदा आणि संसार-निंदा हे भयानक त्रिदोष " पाहून श्री. माडखोलकराना " अगदी चीड येते " स्त्रीनिंदेबद्दल त्यानी लिहिले आहे : " आई, बहीण, बायको, मुलगी आणि सून अशा पाच नात्यानी जन्मापासून मरेपर्यंत जी स्त्री पुरुषाला साथ देते, त्या स्त्रीच्या माथी आपल्या अधःपाताचे खापर त्यानी फोडावे आणि आत्मोन्नतीच्या मार्गातील धोंड म्हणून तिला लाथाडावी, यापरता दुसरा कृतघ्नपणा तो कोणता ?" (पान ५४) हे उद्गार मोठे स्पष्टपणाचे आणि धिटाईचे आहेत. संतवाङ्मयावरील लिखाणात असा धीटपणा क्वचित्च दृष्टीस पडतो.

श्री. माडखोलकर यानी दुसरा जो प्रबळ दोष दाखविला आहे तो म्हणजे " लोकस्थिती नासू द्यावयाची नाही व लोकसंस्थेचे रक्षण करावयाचे " हा संतकवींचा आग्रह ज्ञानदेवानी या आग्रहाचा पहिला पुकारा केला आणि त्यांच्यामागून आलेल्या इतर सर्व संतानी त्यांचे अनुकरण केले असे त्यांचे प्रतिपादन आहे, सतराव्या शतकापर्यंतच्या संतानीच नव्हे तर एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील विचारवंतानीही ज्ञानदेवांचा तो " वारसा " पुढे चालवला असे ते म्हणतात. त्यांनी लिहिले आहे : " ज्ञानेश्वरीच्या रूपाने लोक-संस्थेच्या रक्षणाचे आणि त्यासाठी लोकसंग्रह करण्याचे जे तत्त्वज्ञान त्यानी ( ज्ञानदेवानी ) निर्माण केले, त्याचाच वारसा पुढे नंतर फुले आणि रानडे, टिळक आणि आंबेडकर, गांधी आणि विनोबा यांनी, आपल्या विशिष्ट प्रकृती-नुसार, पुढे चालविला. " ( पान १५ ) ज्ञानदेवकालीन लोकव्यवस्था म्हणजे जन्मजात उच्चनीचतेच्या कल्पनेवर आधारलेले चातुर्वर्ण्य आणि जाती हे लक्षात घेतले म्हणजे श्री. माडखोलकर यांचे हे विधान निदान फुले, रानडे आणि आंबेडकर यांना तरी लागू पडत नाही. हे तिघेही चातुर्वर्ण्याचे आणि जातीभेदाचे कट्टे विरोधक होते. चातुर्वर्ण्य आणि जातीभेद नष्ट करण्याचे त्यांचे मार्ग कदाचित वेगवेगळे असतील, पण त्या दोन्ही संस्था नष्ट झाल्या पाहिजेत याबद्दल तिघांचेही एकमत होते. श्री. माडखोलकरांच्या या विधाना-वरून लोकसंस्थेचे रक्षण करण्याचा ज्ञानदेवांचा आग्रह त्यांना विशेष दोषास्पद वाटत नसावा अशीही शंका येते.

" आधुनिक महाराष्ट्राचा वारसा " हा पुस्तकाचा दुसरा भाग आजच्या राजकारणाच्या व समाजकारणाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचा आहे. या

भागातील विवेचन केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे नसून आजच्या जीवनावर व विचारावर त्याचा खोल ठसा पडण्याची शक्यता आहे. लेखकाचाही हेतू केवळ इतिहासकथन हा नसावा; समाजाला मार्गदर्शन करणे हा त्याचा प्रधान हेतू असावा. म्हणूनच मार्गदर्शन कोणते झाले ते पाहणे अगत्याचे आहे.

इतिहासकथन उत्तम झाले आहे यात शंका नाही. एकोणिसाव्या शतकात व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात जे नामांकित विचारवंत व मातबर राजकीय आणि सामाजिक कार्यकर्ते होऊन गेले त्यांच्या कार्याची व विचारांची ओळख लेखकाने मोजक्या पण मनोवेधक शब्दात करून दिली आहे. या महापुरुषामध्ये त्याने बडोद्याचे सयाजीराव महाराज व कोल्हापूरचे शाहू छत्रपती याना मानाचे स्थान दिले हे त्याचे वैशिष्टच समजले पाहिजे. दोन्ही राजपुरुषानी समाज-क्षेत्रात विशेषेकरून विद्येचा प्रसार आणि दलितांचा उद्धार या बाबतीत, प्रचंड कार्य केले असले, तरी विचारामध्ये त्यानी भर घातली असे म्हणणे कठीण आहे. त्यांच्या महनीय कार्याची लोकाना ओळख व्हावी आणि त्यांच्याबद्दलचे, विशे-षतः शाहू छत्रपतीबद्दलचे, पांढरपेशा सुशिक्षितांच्या मनातील गैरसमज दूर व्हावेत, म्हणूनच बहुतेक लेखकाने त्यांचा आपल्या विवेचनात समावेश केला असावा.

या दोन नृपतींचा समावेश करण्याइतकी लेखकाची दृष्टी व्यापक आहे. पण त्या दृष्टीतून १९२० नंतर वाढलेली गांधीवादी व १९३० नंतर वाढलेली समाजवादी या चळवळी व विचारधारा कशा निसटल्या ते समजत नाही. गांधी-वादाने व समाजवादाने राष्ट्रवादाला नीतिमत्तेचे व मानवतेचे अधिष्ठान दिले. दोन्ही प्रवृत्ती महाराष्ट्रात बलवत्तर ठरल्या नाहीत हे खरे. पण राष्ट्रवादाची निकोप वाढ व्हावयाची तर त्या प्रवृत्तींची राष्ट्रवादावर छाप पडणे अगत्याचे आहे. मार्गदर्शनपर अशा या पुस्तकाच्या विवेचनात त्या दोन्ही प्रवृत्तींचा समावेश व्हायला हवा होता. पुस्तकाच्या शेवटच्या काही पानात श्री. डांगे यांच्या अनुषंगाने श्री. माडखोलकर यानी साम्यवादाचा थोडा ऊहापोह केला आहे. पण तो सारा साम्यवादी चळवळी विषयीच्या व कॉ. रॉय यांच्या भूमिकेविषयीच्या अपुऱ्या व विपर्यस्त माहितीवर आधारलेला आहे. त्याची सविस्तर चर्चा करण्यासाठी एक वेगळा प्रबंधच लिहावा लागेल.

या भागातील विवेचनावरून असे दिसते की काही मंडळी श्री. माडखोल-करांची लाडकी आहेत तर काही मंडळी नावडती आहेत. आवडत्या मंडळीत रानडे, टिळक व आंबेडकर यांची गणना करता येईल, तर नावडत्या मंडळीत लोकहितवादींचा पहिला नंबर लागेल. लेखकाच्या अशा आवडीनिवडी नसाव्यात

असे कुणालाही म्हणता येणार नाही, पण त्या वस्तुनिष्ठ असाव्या आणि विचारधनाच्या संदर्भात त्या विचारनिष्ठ असाव्यात; इतर अवांतर गोष्टीवर आधारलेल्या नसाव्यात. लोकहितवादींवर माडखोलकरांचा राग ते कर्ते सुधारक नव्हते म्हणून. त्यासाठी माडखोलकरांनी त्यांना दांभिक ठरवले आहे, त्यांची कंजुषी बाहेर काढली आहे, आणि मुद्दाम प्रयत्न करून त्यांनी घेतलेल्या "सरबराई"ची माहिती मिळवली आहे. लोकहितवादींच्या चरित्रात या गोष्टींना जरूर स्थान मिळावे. पण माडखोलकर त्यांचे चरित्र लिहीत नव्हते: विचारधनात त्यांनी घातलेल्या भरीचे संतुलन करणे हे त्यांचे कार्य होते. पण वैयक्तिक दोषाकडे अधिक लक्ष गेल्यामुळे हे संतुलन नीट झाले नाही आणि लोकहितवादींना न्याय मिळाला नाही. काल उलटल्यानंतर व्यक्तीचे गुणदोषसंकुल चरित्र विसरले जाते, महत्त्व उरते ते तिच्या विचारांचे. लोकहितवादींचे महत्त्व हेच की शंभर सव्वाशे वर्षांपूर्वी त्यांनी व्यक्त केलेले विचार आज देखील समाजाला मार्गदर्शक ठरू शकतात.

रानडे, टिळक व आंबेडकर यांचा "आपल्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वंकष प्रभाव पाडणारे चार महापुरुष" म्हणून माडखोलकर उल्लेख करतात. त्यांच्या दृष्टीने चवथे महापुरुष म्हणजे सयाजीराव महाराज. त्यांच्या या मूल्यमापनाशी या ठिकाणी वाद नको, पण वाद घालावा लागतो तो रानडे, टिळक व आंबेडकर यांना एकाच माळेत गोवण्याच्या त्यांच्या आग्रहाशी. माडखोलकरांच्या समन्वयवादी दृष्टिकोनाचे हा आग्रह हे एक उत्तम उदाहरण आहे. परंतु अशा समन्वयामुळे विचारांचा प्रवाह कुंठित होतो आणि संचित विचारधनाचे संस्करण व संवर्धन होत नाही.

माडखोलकरांच्या मते रानडे, टिळक, आंबेडकर आदि सारे "मनिषी" "धर्मशील" म्हणजेच "परंपरवादी अर्थात् "कॉन्झर्व्हेटिव्ह" होते. वेदोक्तापासून बालविवाहप्रतिबंधापर्यंतच्या साऱ्या सुधारणा विरोध करणाऱ्या व चातुर्वर्ण्य आणि जातिभेद यांचे समर्थन करणाऱ्या लोकमान्य टिळकांना व 'चातुर्वर्ण्याच्या उच्चाटनापासून तो नवधर्माच्या प्रवर्तनापर्यंत" साऱ्या उपक्रमांना ज्याने आपल्या प्रतिभाशाली दृष्टीने प्रेरणा दिली त्या न्यायमूर्ती रानडे या दोघानाही "परंपरावादी" म्हणणे म्हणजे त्या शब्दाला काहीतरी वेगळा अर्थ देण्यासारखे आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रचलित असलेल्या ब्राह्मणी धर्माचे व संस्थांचे टिळक पक्षपाती व समर्थक होते तर विषमतेवर आधारलेल्या त्या धर्माचे व संस्थांचे उच्चाटण करणे हे रानडे यांचे उद्दिष्ट होते. समाजकारण व राजकारण या दोन्ही क्षेत्रातील

अनुक्रमणिका

दोघांच्या विचारसरणीतील मूलभूत भेदामुळेच महाराष्ट्रामध्ये नंतर रानडेपंथ व टिळकपंथ असे दोन विरोधी विचारप्रवाह निर्माण झाले. एखाद्या सर्वंकश कल्पनेच्या आधाराने त्यांचे एकीकरण करणे मनाला सुखावह वाटत असले, तरी समाजाच्या प्रगतीला ते उपकारक ठरत नाही. काँझर्व्हेटिव्ह या शब्दाचा रूढ अर्थ सद्यस्थितीचा संरक्षक असा आहे. या अर्थाने टिळक राजकीय क्षेत्रात काँझर्व्हेटिव्ह नव्हते; व रानडे राजकीय व सामाजिक या दोन्ही क्षेत्रात काँझर्व्हेटिव्ह. दोन्ही क्षेत्रात त्याना आमूलाग्र बदल घडवून आणावयाचा होता. बदल घडवून आणण्याचा त्यांचा मार्ग क्रांतीचा नव्हता, उत्क्रांतीचा होता एवढेच. म्हणूनच. ते उदारमतवादी होते; स्थितिनिष्ठ अगर काँझर्व्हेटिव्ह नव्हते.

समन्वय साधण्याच्या बुद्धीमुळे डॉ. आंबेडकर यांच्यावर तर मोठाच अन्याय झाला आहे. त्यांच्या हिंदू धर्माला व समाजाला अनुकूल अशा पूर्वायुष्यातील वचनांचाच फक्त उल्लेख आहे. पुढच्या काळात त्यानी जी हिंदू धर्मावर विदारक टीका केली तिचा उल्लेख नाही. हिंदू धर्म, त्याचे चातुर्वर्ण्य व जातीसंस्था, त्यांच्या चालीरीती आणि त्यांच्या रोमरोमात भिनलेली विषमता यांच्यावर डॉ. आंबेडकर यानी केलेल्या मर्मभेदक आणि घणाघाती टीकेसारखी टीका आधुनिक काळात कुणीही केली नसेल. हिंदू धर्म स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांना धोक्याचा असून लोकशाहीशी तो विसंगत आहे, ( Hinduism is a menace to liberty, equality and fraternity. On that account it is incompatible with democracy ) असे त्यांचे निश्चित मत होते. हिंदू संस्कृती ही मानवी समाजाला दडपण्यासाठी व दास्यात ठेवण्यासाठी तयार केलेली राक्षसी यंत्रणा आहे, [ It ( Hindu civilization ) is a diaborical contrivance to suppress and enslave humanity. ] असेही त्यांचें मत होते. डॉक्टर साहेबांच्या धर्मांतराचा व धर्मचक्रपरिवर्तनाचा माडखोलकरानी उल्लेख केला आहे. बौद्ध धर्म स्वीकाराच्या वेळी घ्यावयाच्या प्रतिज्ञांकडे त्यानी लक्ष द्यावयास हवे होते. त्यापैकी काही प्रतिज्ञा आहेत त्या अशा : राम व कृष्ण याना मी देव मानणार नाही: गौरी गणपती इत्यादि हिंदु धर्मातील कोणत्याही देवदेवतेस मीं मानणार नाही; देवाने अवतार घेतले यावर माझा विश्वास नाही; बुद्ध विष्णूचा अवतार हा खोडसाळ आणि खोटा प्रचार आहे; माझ्या जुन्या, मनुष्यमात्राच्या उत्कर्षाला हानिकारक असणाऱ्या आणि मनुष्यमात्राला असमान व नीच मानणाऱ्या हिंदु धर्माचा मी त्याग करतो

व बुद्धाच्या धर्माचा स्वीकार करतो. या प्रतिज्ञा घेणाऱ्या मंडळींना आजच्या हिंदु धर्मात स्थान आहे का याचा माडखोलकरानी विचार करायला हवा होता. आपल्या भूमिकेच्या समर्थनार्थ ते जुन्या काळातील अवैदिक व निरीश्वरवादी पंथोपपंथाकडे बोट दाखवू शकतील. पण हिंदु समाजामधे ते सामावून जाण्यासाठी शतके उलटावी लागली आणि सामाजिक व्यवस्था कायम राहून त्याना खालचे अगर वरचे स्थान दिले गेले. आजचे अस्पृश्यांचे व दलितांचे बंड आहे ते प्रस्थापित समाज व्यवस्थेविरुद्ध आहे. जोतिबा फुले व आंबेडकर यानी त्या बंडाचा पुकारा केला. परंपरावादी म्हणून त्यांच्यावर शिक्का मारून त्यांना टिळकांच्या पंक्तीत बसवणे म्हणजे गेल्या शतकातील इतिहासाकडे दुर्लक्ष करण्यासारखे आहे.

माडखोलकर रानडे, टिळक, आंबेडकर यांचे जसे गुणगान गातात तसेच सावरकरांचेही. स्वातंत्र्यवीर सावरकरांची देशभक्तीबद्दल, शौर्य-धैर्याबद्दल व स्वार्थत्यागाबद्दल जी स्तुती करण्यात आली आहे, तिला कुणीही आक्षेप घेणार नाही. पण उत्तर आयुष्यात त्यानी जे हिंदु महासभेचे राजकारण केले ते देशाच्या एकात्मतेच्या दृष्टीने कितपत श्रेयस्कर होते ? माडखोलकराना ते राजकारणही आवडले असे दिसते. ते लिहितात : "हिंदु महासभा आणि हिंदु समाज यांचा जो अंशतः तरी कायापालट त्यांच्या धडाडीमुळे आणि धैर्यामुळे झाला, ती त्यांच्या उत्तरायुष्यातील कामगिरी, त्यांच्या पूर्वायुष्यातील कामगिरी इतकीच, क्रांतीकारक आणि ऐतिहासिक आहे." (पान १५०) हिंदु महासभा हा आज देशातील एक अत्यंत लहान पक्ष असून राजकीय आणि सामाजिक या दोन्ही दृष्टीनी तो अतिशय प्रतिगामी पक्ष म्हणून ओळखला जातो. निर्बंधमुक्त झाल्यानंतर अशा प्रतिगामी पक्षाचे पुढारीपण सावरकरानी स्वीकारावे याचा अर्थ हा की नवीन काळाच्या गरजा व जाणिवा त्यानी ओळखल्या नाहीत. माडखोलकरानी त्यांच्या "हिंदु" या शब्दाच्या व्याख्येचे कौतुक केले आहे. पण ती व्याख्या शब्दार्थाने घेतली तर आजच्या परिस्थितीत मुसलमान, ख्रिश्चन, ज्यू, पारशी इत्यादि सर्व अहिंदु तिच्यातून वगळले जातात ही वस्तुस्थिती आहे. या वेगवेगळ्या धर्माच्या लोकांची आज तरी भारतभूमी ही "पुण्यभू" नाही. रावसाहेब साळवे व बॅ. छगला यांच्या माडखोलकरानी उल्लेखिलेल्या अभिप्रायामुळे ती परिस्थिती बदलणार नाही. कालांतराने धर्माचे वर्चस्व कमी होईल त्या वेळी आपआपल्या धर्माच्या पुण्यभूबद्दलचे त्यांचे आकर्षण कमी होईल. पण त्यावेळी पुण्यभूच्या उल्लेखाचे कारणच उरणार नाही. मातृभू अगर पितृभूचा उल्लेख पुरेसा होईल.

अनुक्रमणिका

श्री. माडखोलकरानी यथार्थपणे वर्णन केलेला हा महाराष्ट्राचा वारसा थोर आहे. परंतु तो एकसंध नाही. तो बहुविध आहे. त्याच्यामध्ये समन्वय साधणे शक्य नाही. तो पारखून पाहिला पाहिजे. स्वातंत्र्यानंतरच्या काळात त्यांच्यापैकी काही भागाचे महत्व केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे उरले आहे तर काही भाग आज देखील मार्गदर्शक ठरण्यासारखा आहे. वाचकानी आपल्या गरजेप्रमाणे त्याचा शोध घेतला पाहिजे. परंतु गरजेचे ठरो न ठरो, विचारधनाचे निरपेक्ष महत्त्व हे असतेच. सुंदर शब्दांचे लेणे चढवून श्री. माडखोलकर यानी सादर केलेले महाराष्ट्राचे विचारधन मराठी वाचकाना बोध व स्फूर्ती देईल अशी खात्री वाटते.



---

## ग्रंथपरिचय-परीक्षण :

# श्रीरामकोश खंड १ ला : भाग १ ला

( वाल्मीकि – रामायण – सर्वांगीण दर्शन )

संपादक:– श्री. अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ, श्रीरामकोश मंडळ, पुणे ३०, ( १९७३ ). पृष्ठे १–२० + १–२६६ + १–२८, किंमत ४० रु.

प्रस्तुत ग्रंथ संपादकांनी संकल्पिलेल्या महान षट्खण्डात्मक योजनेतील प्रारंभिक पहिला खंड ( त्यातीलही पहिला भाग ) आहे. संपादक श्री. अमरेन्द्र गाडगीळ यांनी योजिलेल्या षट्खण्डात्मक श्रीरामकोशाचे विषय खण्डशः असे आहेत :– १) रामायणाशी संबंधित व्यक्ती – घटना – स्थळे – महत्त्वाचे विषय, रामायणाच्या भारतातील व इतरत्र उपलब्ध असलेल्या आवृत्ती. २) श्रीराम व रामायणविषयक जगातील सर्व साहित्य. ३) श्रीराम- उपासना –विधिविधाने– स्तोत्रादिसंग्रह. ४) रामभक्त– भक्तिपरंपरा आणि संप्रदाय, यात्रा, उत्सव इत्यादि ५) रामकथासार, संशोधन, चिकित्सा आणि जीवनव्यापी श्रीराम. ६) श्रीराम : शिल्प–चित्र–मूर्ति–मंदिरे.

वर निर्दिष्ट केलेल्या महान् षट्खण्डात्मक श्रीरामकोशांच्या योजनेतील प्रस्तुत ग्रंथ हा पहिला खंड व त्यांतील भाग पहिला आहे. यांत वाल्मीकि-रामायणाचे सर्वांगीण दर्शन करून दिले आहे. याच पहिल्या खंडाच्या पुढच्या दुसऱ्या भागात काय येणार आहे याबद्दल निःसंदिग्ध उल्लेख संपादकीय निवेदनात नाही. परंतु वर जी खंडशः विषयांची यादी दिली आहे तीवरून दुसऱ्या भागात बहुधा रामायणातील घटना, आणि रामायणाच्या भिन्न भिन्न आवृत्ती ( versions ) यांचा ऊहापोह केला जाईल असा तर्क करता येतो.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या वीस पानात संपादकांचे प्रास्ताविक, श्रीमत् प. प. श्रीधरस्वामी महाराज यांचे श्रीरामासंबंधी एक प्रवचन, व या ग्रंथांतील साहित्याची सविस्तर व बारकाईने पृष्ठशः दिलेली अनुक्रमणिका आहे. त्यानंतर पुढील १२४ पानांमधून वाल्मीकि-रामायणात आलेल्या व्यक्तिविशेषांचा परिचय करून देण्यात आला आहे. यापुढील १२२ पानांमधून रामायणात आलेल्या देवता, गण-जाति, देश, नगरे, ग्रामे, पर्वत, वने, सरोवरे, इतर स्थळे यांचा परिचय दिला असून, शिवाय, रामायणातील कुटुंबव्यवस्था, वर्णव्यवस्था, लोकस्थिति, यज्ञसंस्था, राजधर्म, व्यवसाय-उदीम इत्यादि समाजशास्त्रविषयक,





दशरथ, राम, वसिष्ठ इत्यादि पात्रांनी आपल्या उपदेशातून प्रकट केलेल्या विचारांमधून सूचित होणारे नीतिशास्त्रविषयक विचार आणि युद्धनीति, युद्धसाहित्य याविषयी माहितीही देण्यात आली आहे. याखेरीज शेवटी २८ पानांच्या स्वतंत्र भागातून अ ते ऐ ( 'इ' व ऋ, ॠ वगळून ) सात परिशिष्टे दिली असून त्यातून वाल्मीकिरामायणाची काण्डशः व सर्गशः अनुक्रमणिका, आप्तवाचक संज्ञा, जनक, दशरथ, विश्वामित्र, रावण इत्यादींची कुलपरंपरा, अस्त्रविद्या व अस्त्रे, शस्त्रास्त्रे, उद्यमी–व्यवसायी, खाद्यपेयपदार्थ, धातू, धान्ये, मापके–परिमाणे, रत्ने, वृक्षवनस्पती, वाद्ये, वाहतूक साधने यांची (अंकारविल्हे सूचीवार ) माहिती देण्यात आली आहे.

वर दिग्दर्शित केल्याप्रमाणे, निरनिराळ्या विषयांवर विस्तृतपणे संकलित केलेली माहिती ही मूळ वाल्मीकि-रामायणातील कांड, अध्याय, श्लोक यांची तपशीलवार नोंद करून त्या आधारे मोठ्या बारकाव्याने व परिश्रमपूर्वक केली आहे. यांतील विविध विषयांवरील कोणतेही विधान करताना त्या विधानाला मूळ ग्रंथाचा अचूक तपशीलवार आधार दिलेला आहे हे पाहून संपादक व संपादकांनीच आपल्या प्रास्ताविकात या कामी ज्यांचे सहकार्य लाधले त्या सहकाऱ्यांपैकी केवळ ज्या एका सहकाऱ्याचा नावनिशीवार उल्लेख केला आहे ते श्री. भाऊ धर्माधिकारी यांनी या कामी वाल्मीकिरामायणाचा अत्यंत बारकाव्याने कसून विचक्षणबुद्धिपूर्वक व्यासंग करण्याचे जे अपार परिश्रम घेतले असावेत त्याची कल्पना येते. त्याबद्दल त्यांचे सादर कौतुक व प्रशंसा वाटून कोणीहि सुजाण वाचक त्यांना धन्यवादच देईल यात शंका नाही.

प्रस्तुत श्रीरामकोशातील विविध विषयांवरील प्रत्येक विधानाकरिता निर्णयसागर छापखान्यात १९३० साली छापलेली रामायणाची तिलकाख्य टीकेसहित असलेली आवृत्ति आधारभूत म्हणून घेतलेली आहे. खुद्द रामायणाच्या आवृत्तीमधील व त्यांत 'क्षेपक उतारे' म्हणन जे दिले आहेत त्यातील संदर्भांचा व तिलकटीकेतील संदर्भांचा प्रस्तुत श्रीरामकोशाकरिता विविध विषयांवरील माहिती गोळा करितांना उल्लेख केला आहे. शिवाय यांतील संदर्भ "श्रीरामकोशमंडळाच्या वाल्मीकिरामायणाच्या 'रामकोश–आवृत्ती' प्रमाणेहि दिले आहेत असे संपादकांनी ( 'भूमिके' मागील पान पहा ) म्हटले आहे. ही श्रीरामकोशमंडळाची वाल्मीकिरामायणाची 'रामकोश' आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे की नाही याचा निर्देश नाही. शिवाय ही 'रामकोश आवृत्ति' निर्णयसागर आवृत्तीचीच पुनर् + आवृत्ति आहे की तीत

काही वेगळेपणा असणार आहे याचाही निर्देश संपादकांनी कोठे केलेला आढळून आला नाही. प्रस्तुत 'श्रीरामकोशा'तील संदर्भाकरिता निर्णयसागर (१९३०) आवृत्तिच आधारभूत का घेतली याचा संपादकानी खुलासा केलेला नाही. खरोखरी त्यासंबंधी खुलासा अपेक्षित होता. बडोदे येथील प्राच्यविद्यासंस्थेने समग्र वाल्मीकिरामायणाची चिकित्सापूर्वक संशोधित आवृत्ति तयार केली असून तिची पहिली सहा कांडे प्रकाशित झाली आहेत. सहाव्या उत्तरकांडाचे दोन भाग प्रकाशित झाले असून तिसरा शेवटचा भाग (संपादकाच्या प्रस्तावनेसह) प्रकाशनाच्या मार्गावर आहे. या संशोधित आवृत्तीचा प्रस्तुत 'श्रीरामकोशा'च्या संपादकांनी उल्लेखही केला नाही. याचे आश्चर्य वाटते. ही संशोधित आवृत्ति आधुनिक पाठसंशोधनशास्त्राच्या सर्वमान्य झालेल्या नियमानुसार केली आहे. त्यात वाल्मीकिरामायणाचा उपलब्ध हस्तलिखिते व आवृत्त्या यांचा शास्त्रीयदृष्टचा तुलनात्मक अभ्यास करून वाल्मीकिरामायणाच्या उपलब्ध पाठात सर्वात जुना पाठ कोणता ते निश्चित केले असून तो अधिकृत म्हणून मोठ्या टाइपात छापला आहे. व इतर सर्व पाठ क्षेपक किंवा प्रतिक्षिप्त म्हणून तारकांकित चिन्हांनी वा स्वतंत्र परिशिष्टांतून छापले आहेत. या संशोधित आवृत्तीचा जर प्रस्तुत 'श्रीराम-कोशा'च्या संपादकांनी आधारभूत म्हणून उपयोग केला असता, तर 'श्रीराम-कोशा'तील विविध विषयांवरील माहितीपैकी कोणती माहिती सर्वात जुन्या अधिकृत पाठांवर आधारित आहे व कोणती तदितर प्रक्षिप्त पाठांवर आधारित आहे याची वाचकाला स्पष्ट कल्पना आली असती. नाही तरी 'श्रीराम कोशा'च्या संपादकांनी निर्णयसागरप्रतीतील 'क्षेपक' भागांचा निर्देश विविध विषयांवरील माहिती देताना केलाच आहे; म्हणजे 'क्षेपक' भागातील माहि-तीचा उपयोग करण्यात त्यांना वावगे वाटत नाही हे स्पष्ट आहे. तर मग निर्णयसागर आवृत्तीनंतर सुमारे पंचवीस वर्षांनी प्रसिद्ध झालेल्या शास्त्रशुद्ध संशोधित आवृत्तीचा उपयोग करून त्यांनी दिलेल्या माहितीचा सर्वात जुन्या पाठावर आधारित व क्षेपकांवर आधारित असा द्विविध प्रकार अद्ययावत् व शास्त्रशुद्ध असा वाचकांपुढे आला असता.

सबंध वाल्मीकिरामायणाचा कसून अभ्यास करून त्यात आलेल्या माहितीचे मोठ्या बारकाव्याने साधार संकलन करून संपादकांनी अत्यंत प्रशंसनीय कार्य केले आहे याचा वर उल्लेख आला आहेच. परंतु प्रस्तुत 'श्रीराम कोशा'तील माहिती, जे भिन्न भिन्न विभाग करून त्यात संकलित केली आहे ते विभाग पहाता, ते विभाग पाडण्यात, त्या त्या विभागांची संरचना करण्यात एक प्रकारचा

विस्कळितपणा, शैथिल्य, पुनरुक्ति, रेखीवपणाचा अभाव इत्यादि दोष नजरेत भरतात. याची प्रस्तुत स्थळी काही ढोबळ उदाहरणे देणेच शक्य आहे. देवतानामे (पान १६) या शीर्षकाखालीच त्यापुढील गणजातिनामे या स्वतंत्र विभागात समाविष्ट केलेली आदित्य, गन्धर्व, किन्नर-किन्नरी, देव, मरुत्, वसु, विद्याधर, विश्वेदेव ही नावे व त्यांची माहिती समाविष्ट करावयास हरकत नाही. कारण हे गण देखील देवतुल्य किंवा देवयोनीच आहेत. यापुढील सामान्य नामे (१४६-१५२), विशिष्ट नामे (१५२-१५५), इतर नामे (१५५-१५८) ह्या विभागांची शीर्षके त्याखाली दिलेल्या माहितीचा विचार करता अगदी ढोंगळ वाटतात शिवाय त्यांतील माहितीची पुनरुक्ति इतरत्र झालेली आहे. उदाहरणार्थ आभूषणें ही नोंद सामान्य नामांखाली (पान १४६), विशिष्ट नामाखाली (१५२) व परिशिष्ट (पान १६) यामधून आलेली आहे. त्याचप्रमाणे सामान्य नामाखालील ओषधी-वनस्पती ही नोंद (पान १४६) वर पुन्हा त्याच विभागात पान १५०–१५२ व पुन्हा परिशिष्ट पान २१–२२ वर आली आहे. तसेच सामान्यनामाखालील खाद्यादी पदार्थ पान १४६ वर, त्याच विभागात धान्ये या नांवाने १४७ वर व पुन्हा १५० पानावर व परिशिष्ट पान १८ खाद्यपेय– पदार्थ यावर आलेली आहेत. विशिष्ट नामे–या विभागाखालील, पायस (पान १५३) हे खाद्यपदार्थ विभागाखाली, मनःशिला (पान १५३) हे धातूखाली, मरुकान्तार (पान १५३–५४) हे स्थलनामाखाली, सुभद्रन्यग्रोध (पान १५५) वृक्ष-वनस्पतीखाली, स्वस्तिक (पान १५५) म्हणजे त्या नांवाची 'होडी' हे वाहातूक साधने परिशिष्ट (पान २७–२८) या भागांत, अशा रीतीने ही सगळी समाविष्ट करणे उचित झाले असते. ही उदाहरणे केवळ बानगी म्हणून दिली आहेत. अशी पुनरुक्तीची व ढोंगळ वर्गीकरणाची उदाहरणे कितीतरी देता येतील. वाल्मीकिरामायणातील विषय म्हणून १८३ ते २६६ या पानातून दिलेल्या माहितीतही समर्पक, रेखीव विभागीकरण व वर्गीकरण आढळून येत नाही. उदाहरणार्थ, क्षात्रधर्म १९८ पानावर तर वर्णव्यवस्था २५३–२५४ पानावर, व्यवसाय-उद्योग २५४–२५५ पानांवर व परिशिष्ट १६–१८ पानांवर अशा या नोंदी आल्या आहेत. रामायणकालीन समाजव्यवस्थेकडे बघता, या सर्व नोंदी वर्णव्यवस्था (गुणकर्मविभागशः) या नोंदीखाली येणे उचित झाले असते. तत्त्वज्ञानविचार (पाने १९९–२०५) या विभागाखाली क्षमा, दैववाद या शीर्षकांबरोबरच रामाचा, वसिष्ठाचा, हनुमानाचा उपदेश, व दशरथ, लक्ष्मण– आदींचे विचार अशा भिन्नभिन्न शीर्षकांखाली उद्धृत केले आहेत. रामायणातील तत्त्वज्ञानविचारांची माहिती देतांना एक तर, त्या विचारांतील

मूलभूत तत्त्वे शीर्षके म्हणून द्यावयाला हवी होती; उदाहरणार्थ दशरथाचे विचार ( पान २००-२०१ ) असे म्हणण्याऐवजी त्यातील सारभूत 'कर्मसिद्धान्त' असे शीर्षक, रामाचा भरताला उपदेश (पान २०१) यातील 'सारभूतकालसिद्धान्त' असे शीर्षक द्यावयाला पाहिजे होते. किंवा तत्त्वज्ञान-विचार या विभागाखाली उपदेश असा उपविभाग करून त्याखाली अकारविल्हे निरनिराळ्या व्यक्तिविशेषांनी- दशरथ, राम, जाबालि इत्यादींनी केलेले उपदेश दिले असते तरी उचित झाले असते. लोकस्थिति ( पृ. २४३-२५१ ) या विभागाखाली अयोध्येतील, लंकेतील समाजदर्शनाबरोबर वैद्यकीय ज्ञान (पान २४४) हीहि नोंद आली आहे. खरोखरी वैद्यकीय ज्ञान ही नोंद- व्यवसाय-उद्यीम (२५४-२५५) याखाली येणे उचित झाले असते. किंबहुना परिशिष्ट पाने (१६-१८) यावर 'उद्यमी-व्यवसायी' याखाली 'वैद्य' ही नोंद आलीच आहे. -एकंदर या 'श्रीरामकोशा'ची रचना बघता असे वाटते की परिशिष्टा-मधील ई १ ते ई १२ इत्यादि विभाग परिशिष्टामध्ये न टाकता, कोशाच्या मुख्य मजकुरात टाकून त्याखाली सर्व इतरत्र विखुरलेली माहिती जर अकार-विल्हेवार वर्गीकृत केली असती तर अधिक समर्पक झाले असते. व कोशाच्या संदर्भयोग्यतेत अधिक भर पडली असती.

प्रस्तुत 'श्रीरामकोशां'त तळटीपांतून वा मुख्य मजकुरात अशी काही विधाने आली आहेत की त्यांचा प्रस्तुत स्थळी विचार करणे उचित होईल : पृष्ठे २०१ व २०२ वर जाबालि ऋषींचे मत दिले असून ते चार्वाकमतासारखे आहे. त्यासंबंधी पृष्ठ २०२ वर संपादक तळटीपेत म्हणतात : "याला 'लोकाय-तिक' मत म्हणतात; 'लोकायतिक' म्हणजे लोकापासून निघालेले, लोकांना कळणारे". लोकायतिक म्हणजे लोकायतसंबंधी किंवा लोकायतमताचे अनुयायी. लोकायत याचा खरा अर्थ 'लोकांमध्ये प्रसृत असलेले' असा आहे- पृष्ठ २०३ वर लक्ष्मणाच्या विचारात असे म्हटले आहे : "अधर्मामुळे जर पापकर्म्यांचा वध होत असेल तर त्या वधकर्मानेच अधर्म मारला जातो मग स्वतः नष्ट झाल्यानंतर तो वध कोणाचा करणार ?" ( निर्णयसागर प्रत ६.८३.२२ ). संपादकांनी यासंबंधी तळटीपेत लाहोरप्रतीतील श्लोक उद्धृत केला असून त्याची दुसरी ओळ 'अधर्मेण हतो धर्मः स हतः किं करिष्यति' अशी आहे. बडोद्याच्या संशोधित आवृत्तीमध्ये ( ६.७०.२१ ) हा श्लोक असा आला आहे. "वध्यन्ते पापकर्माणो यद्यधर्मेण राघव । वधकर्महतो धर्मः स हतः कं वधिष्यति ॥" याचा अर्थ असा. "अधर्मामुळे जर पापकर्म्यांचा वध होत असेल तर त्या वधकर्मानेच

अनुक्रमणिका

धर्म मारला जातो. मग ( धर्म ) स्वतः मारला गेल्यावर तो कोणाला ठार करील ? " वर अधोरेखित शब्दात व्यक्त झाल्याप्रमाणे धर्म मारला जातो; ( संपादकांनी निर्णयसागर प्रतीवर विसंबून केलेल्या अर्थाप्रमाणे ) अधर्म मारला जात नाही. लाहोरप्रतीलाहि धर्म हा अधर्मामुळें मारला जातो हेच अभिप्रेत आहे. लक्ष्मणाने प्रकट केलेल्या विचारसरणीशी लाहोरप्रतीतील व बडोदाप्रतीतील पाठ अधिक सुसंगत आहे. – पृष्ठ २०४ व २०५ वर सीतेने रामाशी बोलतांना अहिंसेचा प्रश्न उत्पन्न केला आहे. त्यावर संपादक तळटीपेत " हा अहिंसोपदेश मध्येच घुसडलेला, ... विसंगत वाटतो " असे म्हटले आहे. उलट तर असे वाटते की सीतेने मृगादिकांच्या हिंसेविरुद्ध समर्थ युक्तिवाद करून आपल्या स्वतंत्र बुद्धीची चमक दाखविली आहे. – पृष्ठ २२१ वर 'लोक अनिद्र व्हावेत अशी इच्छा करणारी ... ... ... भृगूची पत्नी हिचा विष्णूने वध केला होता' ( 'निर्णयसागर' प्रत १.२५.२१. ) असा अनुवाद केला आहे, याच विधानाच्या अनुषंगाने संपादकांनी ( 'अनिद्र'च्या ऐवजी ) 'अनिन्द्र' असा दुसरा पाठ आहे असा तळटीपेत निर्देश केला आहे. बडोदा आवृत्तीत ( १.२४.२८ ) अनिन्द्र असाच पाठ असून तोच अन्वर्थक आहे. – पृष्ठ २५१ वर " दशरथाने विश्वामित्राला सांगितले 'अजून हा पुरा बारा वर्षांचा झाला नाही' 'ऊनद्वादशवर्षोऽयम् ( निर्णयसागर प्रत ३.३८.६ )', यावर संपादकांनी तिलक-टीकाकाराने 'ऊनषोडशवर्षोऽयम्' असा तळटीपेत उल्लेख केला आहे. बडोदा आवृत्तीने ( ३.३६.६ ) 'ऊनषोडशवर्षोऽयम्' हाच पाठ स्वीकारला असून तो अधिक अन्वर्थक आहे.– पृष्ठ २६५ वर " रामाला यौवराज्याभिषेक झाल्याने रामाच्या " परमाः स्त्रियः' आनंदित होतील ( निर्णयसागर प्रत २.८.१२ ) " असा अनुवाद देऊन त्याखाली तळटीपेत 'रामाच्या ... संबंधात बहुपत्नीत्वाचा उल्लेख एवढा येथेच आहे' असे संपादकांनी म्हटले आहे. बडोदा आवृत्तीत ( २.८५ ) 'हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्य परमाः स्त्रियः' या ओळीतील डॉ. प. ल. वैद्य या ( बडोदे आवृत्ति – युद्धकांडाच्या ) संपादकांनी 'परमाः स्त्रियः' याचा अर्थ 'रामाला प्रिय असलेल्या कौसल्या, सुमित्रा व कैकयी देखील होत' असा अर्थ दिला आहे व तोच रामचरित्राच्या दृष्टीने यथार्थ वाटतो.– पृष्ठ २६ वर ( परिशिष्टः ए ) पहिल्या कांडातील अध्याय तीन यामध्ये रामायणातील प्रमुख घटनांचा उल्लेख आला आहे. या अनुषंगाने तळटीपेत संपादक म्हणतात : "पण या 'सूची'त सीतेचे अग्निदिव्य या घटनेचा उल्लेख नाही, ही विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे. यावरून

हा घटनानुक्रम रचणाऱ्याच्या काळी रामायणात अग्निदिव्याच्या घटनेचा अंतर्भाव नसावा." या प्रकरणी डॉ. प. ल. वैद्य यांनी बडोदा आवृत्तीच्या युद्धकांडाच्या प्रस्तावनेत केलेला ऊहापोह उद्बोधक आहे. महाभारतात आरण्यकपर्वात 'रामोपाख्यान' आले आहे. त्याचा डॉ. वैद्यांनी सूक्ष्म अभ्यास करून रामायणांतील घटनांशी त्याची तुलना केली आहे. 'रामोपाख्याना'त अग्निदिव्याचा मुळीच उल्लेख नाही. वायु हा सीतेच्या शुद्धत्वाविषयी ग्वाही देतो असे त्यात म्हटले आहे. म्हणजे महाभारतातील 'रामोपाख्यान' ज्या रामायणकथावृत्तीवरून संगृहीत केले गेले त्यात अग्निदिव्याचा उल्लेख नव्हता. त्या रामायण-कथावृत्तीत वाल्मीकींनी, ती कथा अधिक परिणामकारक करण्याकरिता अग्निदिव्याची भर घातली, असा डॉ. प. ल. वैद्य यांनी निष्कर्ष काढला आहे. ( बडोदा आवृत्ति युद्धकांड, इंट्रोडक्शन पान ३५ पहा. ).

कोश म्हणजे उत्तम संदर्भयोग्य ग्रंथ या दृष्टीने प्रस्तुत परीक्षणकाराला ज्या या 'श्रीरामकोशा'च्या रचनेत व विभागीकरणात त्रुटी वाटल्या व काही विधाने चिंत्य आहेत असे आढळून आले. त्यांचे संक्षिप्तपणे दिग्दर्शन केले आहे. संपादक श्री. अमरेन्द्र गाडगीळ व त्यांचे एक प्रमुख सहकारी भाऊ धर्माधिकारी यांनी या 'श्रीरामकोश' तयार करण्याच्या कामी जे अपरंपार परिश्रम घेतले आहेत त्याबद्दल ते प्रशंसेस व धन्यवादास पात्र आहेत यात शंका नाही. संपादकांनी पान २० वर वाल्मीकिरामायणात चित्रित केलेली ही सामग्री "या भागांत एकत्र करून सुव्यवस्थित मांडून प्रदर्शित करण्याचा हा प्रयत्न आहे." असे आपले मनोगत प्राञ्जळपणे व्यक्त केले आहे. त्यांच्या मनात असलेली सुव्यवस्थित मांडणी खरोखरीच संदर्भग्रंथदृष्ट्या जास्तीत जास्त सुव्यवस्थित व्हावी याच हेतूने वर काही गोष्टींचा ऊहापोह संक्षिप्तपणे केला आहे. संपादक अमरेन्द्र गाडगीळ यांनी जो षट्खंडात्मक 'श्रीरामकोशा'चा प्रचंड उद्योग अंगीकृत केला आहे तो अत्यंत आवश्यक व महत्त्वाचा असून त्यात त्यांना सुयश चिंतिणे हे प्रत्येक संस्कृतिप्रेमी अभ्यासकाचे कर्तव्यच आहे.

— वि. म. बेडेकर